## चिखलदऱ्यातील प्रेक्षणीय स्थळ

- भीमकुंड
- वैराटची देवी
- बीर तलाव
- पंचबोल पॉईंट
- काळा पानी तलाव
- महादेवाचे मंदिर
- व्याघ्र संग्रहालय
- हरिकेन पॉईंट
- मोझरी पॉईंट
- प्रास्पेक्टस् पॉईंट
- देवी तलाव
- मंकी पॉईंट
- गोराघाट

# किल्ले

# गाविलगड - नरनाळा


**र.रा.बोरकर**

एम.ए. (पुरातत्त्व)
पदविका-संग्रहालयशास्त्र
पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालये विभाग
अमरावती.



**नगर परिषद चिखलदरा.**

❖ **किल्ले गाविलगड-नरनाळा**

FORT Gavilgad-Narnala

(Historical & Tourist Book)

---



❖ मुखपृष्ट सजावट/नकाशा रेखन

**श्री. एस. जे. महाजन अमरावती**

**श्री. सी. डी. जगदाळे अमरावती**

❖ प्रकाशक

**नगर परिषद, चिखलदरा.**

❖ अक्षर जुळवणी

**रवी डाहाके**

नभ कॉम्प्युटर्स,

मालटेकडी रोड,अमरावती.

❖ मुद्रक

**मिलिंद डाहाके**

नभ ऑफसेट प्रिन्टर्स,

मालटेकडी रोड,अमरावती.

❖ **प्रथमावृत्ती-२०००**

❖ **मूल्य - ५० रू.**

**(या पुस्तकातील इतिहास संशोधनाशी प्रकाशक सहमत असतीलच असे नाही.)**

कैलासवासी
जेष्ठ बंधु
श्री जगदेवराव रामकृष्णजी बोरकर
यांच्या पवित्र आणि प्रेरक स्मृतीस.

# प्रस्तावना

प्राचीन स्मारके ही भारतीय संस्कृतीची बहुमूल्य ठेव ! किंबहुना ते भारतीय संस्कृतीच्या शिक्षणाचे प्रमुख केंद्रे होत. किल्ल्याचे महत्व तर अन्यन्यसाधारण असेच आहे. तिथे अनेक स्थितंतरे व घटना घडल्या असतात. म्हणून किल्ल्याकडे इतिहासाच्या अभ्यासाचे प्रमुख साधन म्हणून पाहिले जाते. अश्या बहुमूल्य राष्ट्रीय संपदेची जपवणूक करणे हे सर्व भारतीय नागरिकांचे आद्य कर्तव्य ठरते आणि म्हणूनच त्यादृष्टीने ह्या पुस्तकांचे महत्व लक्षणीय ठरते.

पर्यटनाच्या दृष्टीने सुद्धा प्राचीन स्मारके अत्यंत महत्वाची ठरतात व प्राचीन स्मारकांच्या विकासाकरिता व जतनाकरिता शासनाच्या योजना आहेत. परंतु त्याहून स्थानीक नागरिकांची जागृत दृष्टी महत्वाची ठरते.

पुरातत्व विभागाचे अधिकारी श्री. रघुनाथ बोरकर यांनी लिहलेले हे पुस्तक चिखलदरा नगरपरिषदेने प्रकाशित करून पर्यटनाच्या दृष्टीने शासनाचे अंगीकृत धोरण राबविण्याचे महत्तम कार्य केले आहे. जो पर्यंत आपल्या परिसरातील प्राचीन ठेव याची माहिती जनसामान्यांपर्यंत पोहचत नाही, त्याचा प्रचार व प्रसार होत नाही तोपर्यंत त्याचे महत्व वाढत नाही. म्हणूनच चिखलदरा नगरपरिषदेचे कार्य प्रशंसनीय असेच आहे. तसेच शासकीय सेवेत राहून, कार्यालयीन कामकाजांच्या दैनंदिन व्यापातून सवड काढून या पुस्तकाचे सर्वांगसुंदर लेखन केले त्या श्री. बोरकरांचे कार्य सुद्धा प्रशंसनीय असेच आहे.

किल्ले गाविलगड-नरनाळ या पुस्तकात किल्ल्याच्या इतिहासासोबतच त्याचा प्राचीन इतिहास, तेथील वास्तू शिल्प, दरवाजे, बुरुजे, मसिदी, मंदिरे, तळी अन्य वास्तू व वस्तूंची थोडक्यात का होईना परंतु नेमकी माहिती देण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. तसेच किल्ल्यातील शिलालेखांचे वाचन करून त्यावर नव्याने प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे. असा प्रयत्न क्वचितच

केला जातो. म्हणूनच हे पुस्तक केवळ पर्यटकांनाच उपयुक्त आहे असे नव्हे तर इतिहासप्रेमी, वास्तुशास्त्रज्ञ, संशोधक, विद्यार्थी आणि सर्वसामान्यांना उपयुक्त ठरावे असेच उतरले आहे.

म्हणून हे पुस्तक प्रत्येक ग्रामपंचायत कार्यालय, शाळा, महाविद्यालय आणि शासकीय कार्यालयाच्या संग्रही असणे आवश्यक वाटते. या पुस्तकातून ज्ञान आणि मनोरंजन ह्या दोन्ही गोष्टी साध्य होणार आहेत. वऱ्हाडातील दोनच किल्ल्यावरची का होईना परंतु सदर माहिती संग्रहीत करण्याचा हा उपक्रम स्तुत्य आहे. याबद्दल लेखकाचे पुनःश्च अभिनंदन ! लेखकाची लेखनी इथेच न थांबता ती वऱ्हाडातील संपूर्ण किल्ल्याची माहिती लिहण्यास सक्षम ठरो हीच शुभेच्छा!

**सुमित मल्लीक**
विभागीय महसूल आयुक्त,
अमरावती.

## लेखकाचे मनोगत

पश्चिम महाराष्ट्र व कोकणातील किल्यांना ज्याप्रमाणे प्रसिद्धी मिळून त्यांचा काही प्रमाणात संरक्षणदृष्ट्या विकास झाला. त्या तुलनेत विदर्भातील किल्ले हे प्रसिद्धीपासून व योग्य संरक्षक विकासापासून वंचीत आहेत. पश्चिम महाराष्ट्राच्या तुलनेत विदर्भात साहित्याचीही वाणवा आहे असेही म्हटले जाते, काही प्रमाणात ते खरेही आहे. तिकडील लेखकांनी प्रामुख्याने विदर्भ वगळता प. महाराष्ट्रातील किल्यावर विविध अंगानी ग्रंथलेखन करून त्यांचा इतिहास उजेडात आणला आहे. विदर्भातील किल्यांच्या बाबतीत मात्र तसे काम फारसे झालेले दिसत नाही. त्यामुळेच ते प्रसिद्धीच्या झोतात आज नाहीत. विदर्भातही अनेक महत्वाचे किल्ले आहेत. किंबहुना स्थापत्यदृष्ट्या गर्भश्रीमंतही आहेत हे फारच कमी जाणकारांना माहीत असावे. विदर्भ हा अनेक अंगानी मागासलेला प्रदेश समजला जातो, तो मागासलेपणा किल्ल्यांच्या जतन व विकासाबाबत सुद्धा दिसतो.

चिखलदरा हे थंड हवेच्या ठिकाणाकरिता प्रसिद्ध आहे. त्याची तुलना पश्चिम महाराष्ट्रातील महाबळेश्वर व माथेरान या थंड हवेच्या ठिकाणाशी केली जाते. चिखलदरा थंड हवेच्या स्थळासाठी प्रसिद्ध आहे. त्या तुलनेत इतिहास प्रसिद्ध गाविलगड किल्यांसाठी मात्र प्रसिद्ध नाही. याची खंत मनात बऱ्याच दिवसापासून होती. माझे 'रत्नागिरी जिल्ह्यातील किल्ले' हे पहिले पुस्तक प्रकाशित झाल्यावर आणि १९९२ ला नागपूरला बदली झाल्यावर विदर्भातील संपूर्ण किल्ल्यांवर पुस्तक लिहावे असे योजिले होते. परंतु दरम्यान 'महाकाली चंद्रपूरची', 'रामटेक', 'कोहळी समाज आणि त्याचा इतिहास' इत्यादी पुस्तकांचे लेखन झाल्यामुळे मनातील मांडे मनातच राहिले. १९९७ ला अमरावतीला बदली झाल्यावर पुन्हा त्याकडे लक्ष वेधले. परंतु कार्य पूर्णत्वांस जाईना. म्हणून प्रथम विदर्भाचे भूषण ठरावे अशा 'गाविलगड' आणि 'नरनाळा' विदर्भातील आघाडीचे शिलेदार असलेल्या दोनच किल्ल्यांवर लेखन करण्यास सुरूवात

केली आणि आज सदर कार्य पूर्णत्त्वांस जात आहे याचा मनस्वी अभिमान आहे.

हा ग्रंथ पर्यटक, इतिहास प्रेमी, पुरातत्त्वज्ञ, विद्यार्थी, हौशी प्रवासी आणि संशोधक यांना उपयुक्त ठरेल असा विश्वासच नव्हे तर खात्री वाटते. आणि असे झाले तरच माझ्या या श्रमाचे चीज झाले असे मी समजेन. माझ्या अन्य पुस्तकांचे वाचकानी मनःपूर्वक स्वागत केले त्याचप्रमाणे 'किल्ले गाविलगड नरनाळा' ह्या पुस्तकाचे सुद्धा मनःपूर्वक स्वागत करतील याची मला खात्री आहे.

ग्रंथ लिहला तरी तो लवकर प्रकाशित होतोच असे नाही. परंतु ह्या ग्रंथाच्या बाबतीत मात्र तसे घडले नाही. याचे सारे श्रेय नगर परिषद, चिखलदरा आणि मुख्याधिकारी श्री. डी.ए. पठाण साहेब, नगर परिषदेच्या सन्माननीय अध्यक्षा आणि व सर्व नगरपरीषद सदस्य यांचेकडेच जाते. त्यांचा मी अत्यंत ऋणी आहे. तसेच 'नभ कॉम्प्युटर ॲन्ड प्रिन्टर्स' चे मिलिंद डाहाके आणि त्यांचे बंधू रवी डाहाके तसेच पंजाब चौधरी यांनी सदर ग्रंथ अल्पावधीत मुद्रित करून दिल्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार.

अमरावती विभागाचे विभागीय महसुल आयुक्त मा. सुमित मल्लीक साहेब यांनी शासकीय कामाच्या दैनंदिन व्यापातून आपला बहुमूल्य वेळ खर्ची करून अल्पावधीत ह्या ग्रंथास प्रस्तावना लिहून दिली. तसेच प्रा. मनोज तायडे यांनी हस्तलिखित तपासून अनेक महत्वपूर्ण सूचना दिल्या त्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी आहे.

शेवटी सांसारिक जीवनात मोलाचा वाटा असलेल्या अर्धांगिनी सौ. सविता, मुलगा दैवत आणि मुलगी वैशाली बोरकर यांना विसरून कसे चालेल? त्यांच्या बहुमूल्य सहकार्याबद्दल अनौपचारिक मनाने आभारी आहेच.

**रघुनाथ बोरकर**

'अरूणा' शासकीय कर्मचारी वसाहत,

कांता नगर, अमरावती.

## प्रकाशकाचे मनोगत

चिखलदरा नगर मेळघाटाच्या सातपुडा पर्वताच्या पठारावर वसलेले अतिशय सुंदर थंड हवेचे ठिकाण आहे. शहराच्या दक्षिणेकडील असलेल्या डोंगर माथ्यावर उभारलेल्या गाविलगड किल्ल्याचे अवशेष दुरूनही दिसतात. पर्यटकांना दुरून होणारे गाविलगडाचे हे मनोहारी दर्शन त्यांची उत्सुकता वाढवते. चिखलदऱ्याला येणारा पर्यटक गाविलगडावर जावून आल्याशिवाय राहत नाही. पण किल्ल्याचा इतिहास आणि त्याच्या रचनेमागची सामाजिक, राजकीय पार्श्वभूमी समजावून न घेता किल्ला 'पाहणे' हे खऱ्या अर्थाने 'पहाणे' नसते. किल्ल्यामधला पुराण पुरूष जोपर्यत तुमच्या कानात कुजबुजत नाही तोपर्यंत तुमच्या पाहण्याला काही अर्थ नसतो.

पर्यटकांना मेळघाटातील गाविलगड आणि नरनाळा या किल्ल्याचा इतिहास व रचना यांची माहिती व्हावी, व ह्या माहितीसह त्यांनी डोळसपणे या किल्ल्यांचे भ्रमण करावे या उद्देशाने एखादे पुस्तक प्रकाशित करण्याचा चिखलदरा नगर परिषदेचा मानस होता. आतापर्यंत गाविलगड व नरनाळा या किल्ल्याबद्दल समग्र आणि संशोधनपर आधारीत एकही पुस्तक उपलब्ध नव्हते. पुरातत्व विभागाचे अधिकारी श्री. बोरकर यांनी उपलब्ध ऐतिहासीक पुराव्यावरून गाविलगड व नरनाळा किल्ल्याचा इतिहास संकलीत केला. नगर परिषदेने या माहीतपर आधारीत पुस्तक प्रकाशित करण्याचे ठरविले. पर्यटकांच्या सोयीसाठी चिखलदरा परिसरातील प्रेक्षणीय स्थळांची माहिती देणारे प्रकरणही यात समाविष्ट करण्यात आले आहे. श्री. मिलिंद डाहाके यांनी पुस्तकांची छपाई उत्तम केली आहे. नगर परिषदेच्या सर्व सदस्यांनी या कामासाठी उत्साह दर्शविला मा. आयुक्त श्री मल्लिक साहेब यांनी पुस्तकाला प्रस्तावना लिहून आपली पर्यटनाबाबतची आस्था दर्शविली आहे. नगर परिषद चिखलदरा यांच्या तर्फे पर्यटकासाठी आणखी काही माहिती पुस्तिका प्रकाशित करण्याची योजना आहे. पर्यटानवर प्रेम करणाऱ्या समस्त जनतेच्या सहकार्याने ही योजना पुर्ण होईल अशी आम्हाला खात्री आहे.

**मोना कासदेकर**
अध्यक्षा
नगर परिषद चिखलदरा

**डि.ए. पठाण**
मुख्याधिकारी
नगर परिषद चिखलदरा

# अनुक्रमणिका

## किल्ले गाविलगड–नरनाळा स्थळ दर्शक नकाशा



# गाविलगडचा नकाशा

चिखलदराकडे
शक्कर तलाव
मछली तलाव
चांदनी बुरूज
मछली दरवाजा
(मुख्य दरवाजा)
तेलीया बुर्ज
दरीया कुंड
वीरभान दरवाजा
(बुरजबंद दरवाजा)
गजरीया घाटी
दिल्ली दरवाजा
खिंड दरवाजा
(मोझरी दरवाजा)
शार्दुल दरवाजा
किचक दरवाजा
खम तलाव
अचलपूर कडे
नगरखाना तोफ
देव तलाव
लोहारी तोफ
मोझरी बुरूज
सोन किल्ल्याचा
बुरूज
धामजी तलाव
कोठार
(वाकर कोठी)
लहान मशीद
धोबी तलाव
लेन्डी तलाव
बहराम बुर्ज
पीरफत्ते तोफ
पीरफत्ते दरवाजा

# १. किल्ले

महाराष्ट्र ही किल्ल्यांची भूमी आहे. मध्ययुगीन काळात महाराष्ट्रातील किल्ल्यांनी एक इतिहास घडविला आहे. छत्रपती शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराज्याची मूहर्तमेढ रोवली ती तोरणागड जिंकूनच; प्राचीन इतिहासातील ऐतिहासिक अन् राजकीय घडामोडींचे स्थळ म्हणजे हे किल्लेच असत. किल्ले बहुतांशत: उंच डोंगरपर्वतांवर बांधले जात असत. जेणेकरून शत्रूला मारा करणे कठीण जाईल आणि स्वपक्षाला स्वत:चे संरक्षण सहजरीत्या करता येईल. भारतात अन्य राज्यातील किल्ले जसे डोंगरदऱ्यांवर बांधलेले आहेत तसे महाराष्ट्रातही सह्याद्री-सातपुड्याच्या डोंगरमाथ्यावर किल्ले बांधलेले दिसतात.

प्राचीन भारतीय इतिहासाचे संशोधन व अध्ययन किल्यांच्या अध्ययनाशिवाय अपुरे ठरते. महाराष्ट्रातील गिरीदुर्गांनीही इतिहासाची सोनेरी पाने सजविलीत; तशी सातपुड्यातील गिरीदुर्गांनीही सजविली आहेत. ह्या गिरीदुर्गांनी मौलिक ऐतिहासिक कामगिरी बजावली आहे. विदर्भात सुद्धा अशाप्रकारचे उल्लेखनीय दोन गिरीदुर्ग आहेत. अमरावती जिल्ह्यातील गाविलगड आणि अकोला जिल्ह्यातील नरनाळा हे दोन्ही किल्ले नैसर्गिक सौंदर्याने जसे मुसमुसले आहेत तसेच ते वास्तुशिल्पाने कसलेले आहेत. भरपूर पाण्याची व्यवस्था बघूनच किल्याची बांधणी झाली असल्याने तेथे कायम शिबंदी ठेवणे सोयीचे होते.

भारतातील अन्य प्रांताच्या तुलनेत महाराष्ट्रामध्ये स्वातंत्र्याची उर्मी अधिक जीवंत व कार्यरत राहिली ती महाराष्ट्रातील किल्यांमुळेच. किल्ल्याचे डोंगरमाथ्यावरील स्थळ, तेथपर्यत जाण्याचा मार्ग, अन् आंत प्रवेश करण्याची वाट सारेच दुर्गम असल्यानेच त्याला दुर्ग म्हणत असत. शत्रूच्या आक्रमणापासून संरक्षण करण्यापासून तर त्यांचा प्रतिकार करून आपले स्वातंत्र्य अबाधित राखण्यापर्यंत ह्या किल्यांनी जी भूमिका अदा केली आहे, ती आजही प्रेरक अशीच आहे. मोकळ्या मैदानात पराक्रम गाजविणारे सैन्य दुर्गा समोर येताच त्याच्या सामर्थ्या समोर, गनिमीकाव्या समोर अन् धूर्तपणे

केलेल्या प्रतिकारा- समोर आपला पराभव मान्य करून परत गेल्याची अनेक उदाहरणे इतिहासात सापडतात. आकाशाचे चुंबन घेण्याच्या प्रयत्नात उंचच्या उंच कड्यानिशी उभ्या असलेल्या डोंगरपर्वतावर पहारेदाराच्या आवेशात, सर्व नैसर्गिक संकटांना तोंड देत अन् मानवी आक्रमणांचा मुकाबला करीत इतिहासाची साक्ष जीवंत ठेवण्यास जणू हे किल्ले आजही उभे आहेत. आपले वार्धक्य जोपासत.

गडकिल्यांचा इतिहास म्हणजे युद्धस्य कथारम्यः किल्यातील वास्तु कौशल्य मनाला मोहवून टाकते. किल्ला पाहिल्यानंतर एक प्रश्न सहज निर्माण होतो की, अशा अवघड ठिकाणी किल्ला बांधलाच कसा असेल ? इतकी प्रचंड तोफ किल्ल्यावर कशी आणली असेल ? या अशा प्रश्नां बरोबरच तत्कालीन राजकीय-सामाजिक परिस्थितीचे चित्रण डोळ्या समोर उभे राहते. हे किल्ले एखाद्या साहसी चित्रपटातील धीरगंभीर नायकासारखी भूमिका बजावत आपल्या मनाला प्रेरणा देत असतात. आठवण करून देत असतात, आपल्या पूर्वजांच्या शौर्याची, मनोनिग्रहाची, पराक्रमाची, स्वातंत्र्याच्या अलौकिक भावनेची, राष्ट्रीय कर्तव्याची, त्यागाची आणि स्वसंरक्षणाच्या मौलिक गरजेची !



# २. <u>गाविलगड</u>

अमरावती जिल्ह्यातील सातपुड्याच्या पर्वतराजीमध्ये चिखलदरा तालुक्याच्या ठिकाणापासून तीन किलोमीटर अंतरावर दक्षिणेस सातपुड्याच्या टेकड्यांमध्ये इतिहास प्रसिद्ध गाविलगड किल्ला बांधलेला आहे. ह्या टेकड्यांना गाविलगड टेकड्या म्हणूनच ओळखतात. टेकड्यांच्या दक्षिणेकडील टोकावर गाविलगड किल्ला आहे. वऱ्हाडातील तीन स्वाभाविक विभागापैकी एक म्हणजे मेळघाट. वऱ्हाडच्या उत्तरेस असलेल्या सातपुडा पर्वताच्या घनदाट डोंगर प्रदेशास 'मेळघाट' असे म्हणतात. मेळघाट प्रदेशात हा गाविलगड किल्ला येतो.

गाविलगड (चिखलदरा) येथे पोहचण्यासाठी नागपूर हे सर्वात जवळचे विमानतळ आहे. नागपूर-अमरावती-चिखलदरा हे अंतर २५० कि.मी. आहे. रेल्वेने जावयाचे असल्यास मध्य रेल्वेच्या अकोला किंवा बडनेरा स्थानकावर उतरून सडकेने चिखलदरा येथे पोहचता येते. अकोला-परतवाडा-चिखलदरा हे अंतर १२० कि.मी.असून अमरावती-परतवाडा-चिखलदरा हे अंतर ८५ कि.मी. आहे. परतवाडा हे मोठे शहर असून त्यापासून चिखलदरा मोथा मार्गे उत्तरेस ३५ कि.मी. अंतरावर आहे. परतवाड्याहून चिखलदरास जाण्यास दोन मार्ग आहेत. एक घटांग मार्गे तर दुसरे धामणगाव गडी मार्गे आहे. नागपूर-अमरावती- अकोला-अचलपूर-परतवाडा येथून पोहचण्याकरिता नियमित बससेवा उपलब्ध आहे.

गाविलगड "२१.४७ उत्तर अक्षांशावर व पूर्वेस ७७.३३" रेखांशावर आहे. येथूनच मेळघाट-चिखलदरा तालुक्याच्या सीमा समाप्त होताच मध्यप्रदेशातील बैतुल जिल्ह्याच्या सीमा सुरू होतात. म्हणजेच गाविलगड व नरनाळा हे दोन्ही किल्ले महाराष्ट्र व मध्यप्रदेशच्या सीमारेषेवर वसले आहेत. येथून काही अंतरावर तापी व पूर्णा नदीचा संगम निमाडजवळ आहे. मेळघाटमध्ये सातपुडा पर्वताचे सर्वात उंच टोक साधारणत: ३४०० फूट उंच आहे. अलिकडच्या मापनावरून वैराट येथील पर्वताची उंची ३८६६ फूट आहे. येथे देवीचे मंदिर आहे. गाविलगड हे समुद्रसपाटीपासून सुमारे ३६०० फूट

उंच आहे. ह्या टेकड्यांच्या पायथ्याशी वाहणाऱ्या तापी नदीने महाराष्ट्र-मध्यप्रदेशाची सीमा आखली आहे. पूर्णा नदी ह्या भूप्रदेशातील सर्वात मोठी नदी होय. किल्ला सातपुड्याच्या उंच माथ्यावर उभारल्यामुळे त्याचे दर्शन ३-४ कि.मी.अंतरावरूनच होते. त्यांच्या जवळच चिखलदरा हे थंड हवेचे ठिकाण आहे.

## चिखलदरा (किचकदरा)-

विदर्भातील थंड हवेचे ठिकाण व आरोग्यधाम म्हणून ओळखले जाणारे चिखलदरा हे एक ठिकाण, महाराष्ट्रातील थंड हवेच्या अन्य ठिकाणांकडे पर्यटन स्थळे म्हणून अधिक लक्ष दिल्या गेले, तितकेच चिखलदऱ्याकडे दुर्लक्ष झाले आहे. या सापत्नभावाची झळ गाविलगडला सुद्धा पोहोचली आहे. अगदी अलिकडे महाराष्ट्रातील पर्यटन व्यवसायाला उत्तेजन देण्याच्या योजेनेखाली चिखलदरा विकासाच्या योजना आखण्यात आल्या आहेत. चिखलदरा भागात अलिकडे मोठ्या प्रमाणावर झालेले वनीकरण आणि लगतच अभयारण्य प्रकल्प असलेले देशातील सर्वात मोठा व्याघ्र प्रकल्प यामुळे चिखलदऱ्यास पुन्हा पूर्वीचे वैभव प्राप्त होण्याचे संकेत मिळत आहेत.

इ.स. १८२३ साली हैद्राबाद कॉन्टिजन्टचे कॅ. रॉबिन्सन यांनी चिखलदरा या थंड हवेच्या ठिकाणाचा शोध घेतला. त्यानंतर ब्रिटीशांनी आपल्या राजकीय उद्दिष्टांसाठी तसेच लाकुड व्यापारासाठी चिखलदरा प्रदेशाचा वापर करून घेतला. तथापि पर्यटकांसाठी कुठल्याही सोयी करून घेतल्या नाहीत. ह्या भागातील आदिवासी आजही फार वाईट स्थितीत जगत आहेत. ह्या परिसरात अनार्य वंशाच्या गोंड, कोरकू, बलई, वडर , लभानी, नहाल इ. आदिवासी जमाती आहेत. त्यात कोरकू व गवळी अधिक आहेत. गेल्या पन्नास वर्षाच्या काळात निरनिराळ्या योजना राबविण्यात आल्याने ह्या परिसराचा बराच विकास झालेला आढळून येतो.

चिखलदरा हे एक छोटेसे गांव आहे. हजारापर्यंत घरे असून चार हजारापर्यंत लोकसंख्या आहे. ब्रिटीश आमदानीपासून सरकारी अधिकाऱ्यांचे वास्तव्य राहिल्याने तालुक्याचा दर्जा मिळालेल्या ह्या ठिकाणी विविध कार्यालये आहेत. दहा हजारापेक्षा कमी लोकसंख्या असूनही प्रशासकीय बाब म्हणून नगर परिषदेची स्थापना झाली आहे.

आजच्या चिखलदऱ्यामध्ये वन विभागाचे कार्यालय, पोलीस ठाणे, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, कुटुंब कल्याण केंद्र, राष्ट्रीयकृत बँका , जिल्हा सहकारी बँकेची शाखा, व्याघ्र प्रकल्प व त्याची कार्यालये, प्राथमिक स्वास्थ केंद्र-रूग्णालय, शाळा-महाविद्यालय, विद्युत विभाग, जलविभाग कार्यालय, पंचायत समिती, उपकोषागार कार्यालये आहेत.

**निवासाची सोय-** चिखलदरा येथे निवास करण्यासाठी खालील हॉटेल उपलब्ध आहेत.

| | |
|---|---|
| १. हॉटेल ग्रीन व्हॅलीज - | ४०० ते १४०० रु. पर्यंत प्रत्येक दिवसासाठी सुट्स उपलब्ध आहे. |
| २. हॉटेल मयुरा रिसॉर्ट - | ५०० ते १२०० रु.पर्यंत दर दिवसाला भाडे असलेले सुट्स उपलब्ध आहे. |
| ३. महाराष्ट्र पर्यटन महामंडळाचे पर्यटक अप्पर प्लॅटो संकूल - | ३०० ते १००० रु. पर्यंत दर दिवसाला भाडे असलेले सुट्स उपलब्ध आहेत. |

याशिवाय नगर परिषदेचे पर्यटक विश्राम गृह राजहंस गेस्ट हॉऊस, अंबीका गेस्ट हॉऊस, महावीर लॉज, अंबीका लॉज इत्यादी मध्यम दर्जाचे निवास स्थाने पर्यटकांना उपलब्ध होऊ शकतात.

सार्वजनिक बांधकाम विभाग, वन विभाग, विद्युत विभाग, जिल्हा परिषद यांची विश्रामगृहे आहेत. ह्यामुळे चिखलदऱ्यास भेट देऊन गाविलगड किल्ल्या सोबतच, व्याघ्र प्रकल्प आणि येथील अनेक निसर्ग सौंदर्याची मजा लुटता येते.

महाभारत काळात अज्ञातवासात असतांना पांडव ह्या भागात वास्तव्यास होते. त्या काळात भीमाने किचकाचा वध केल्याचा प्रसंग ज्या दरीत घडला. त्यावरून यांस किचकदरा असे नाव पडल्याचीही आख्यायिका आहे. ह्या भागातील काही स्थळे पांडवांच्या नावाने ओळखली जातात.



# ३. प्राचीन इतिहास

गाविलगड व नरनाळा या किल्ल्यांना वऱ्हाडचे आघाडीचे शिलेदार म्हणून उल्लेख केल्यास अतिशयोक्ती होणार नाही. कारण वऱ्हाडातील हे एकमेव अभेद्य डोंगरी किल्ले होत. मध्ययुगात गाविलगड जिंकल्याशिवाय वऱ्हाड जिंकला असे मानले जात नव्हते.

प्राचीन विदर्भ देशाची सीमा दूरवर पसरलेली होती. विदर्भाचा वऱ्हाड हा एक प्रांत होता. विदर्भाचा उल्लेख महाभारतातही आढळतो. महाभारत कालीन काही घटना वऱ्हाडच्या भूमीवरही घडल्या. श्रीकृष्णाने रुक्मिणीला ज्या कुंडिनपूरातून पळवून नेले. ते कुंडिनपूर (कौंडिण्यपूर) वऱ्हाडातीलच. ज्या मंदिरात लग्न केले, ते अंबादेवीचे मंदिर इंद्रपूरी अमरावती मधीलच.

रुक्मिणीचा भाऊ राजा रुक्मी याने आपला वृद्धापकाळ अमरावती शहरापासून पश्चिमेला १४ कि.मी. अंतरावर असलेल्या भातकुली या गावी व परिसरात घालविला असल्याचा उल्लेखही महाभारतात सापडतो. प्रख्यात प्राचीन प्रणयकथा नलदमयंतीची कथा विदर्भातीलच.

चिखलदऱ्याचा प्राचीन इतिहास सुध्दा महाभारत काळापर्यंत पोचतो. पांडव अज्ञानवासात असतांना त्यांच्या अज्ञातवासाचे दिवस सातपुडयाच्या पर्वताच्या सानिध्यात घालविले होते. त्या काळी तेथे राजा विराटाचे राज्य होते. त्याची राजधानी चिखलदऱ्याच्या पश्चिमेस ११ कि.मी. अंतरावर विराटनगर (वैराट) येथे होती. या विराटनगरीत पाच पांडव व द्रौपदी वेषांतर करुन राहत होते. द्रौपदी विराट राजाच्या पट्टराणीची दासी बनली होती. विराटाचा साळू किचक याची नजर द्रौपदीवर पडली. द्रौपदीचे सौंदर्य बघून त्याच्यात कामवासना निर्माण झाली. द्रौपदीने वश व्हावे म्हणून तो विराटाच्या पत्नीस म्हणजेच आपल्या बहीणीस विनवू लागला. किचकाच्या वाईट हेतूचा वृतांत द्रौपदीने भीमाच्या कानावर घातला. वृतांत ऐकताच महाबली भीम क्रोधीत झाला वेळ आणि संधी साधून त्याने किचकाचा वध केला आणि किचकाचा मृतदेह वैराटच्या १३ कि.मी. अंतरावरील दऱ्यात (खाईत) फेकून दिला. किचकाच्या वधामुळे

त्याच्या मृतशरीरातून वाहणाऱ्या रक्ताने भीमाचे शरीर ओलेचिंब झाले म्हणून त्याने रक्ताने माखलेले आपले शरीर स्वच्छ करण्याकरिता ज्या कुंडात स्नान केले त्यास 'भीमकुंड' या नावाने ओळखले जाते. आणि ज्या दरीत किचकास फेकले त्यास 'किचकदरा' या नावाने ओळखले जावू लागले काही दिवसानंतर किचकदरा या शब्दाचा अपभ्रंश 'चिखलदरा' हे नाव पुढे आले.

प्रस्तुत कहाणीस पुरातत्वीय किंवा ऐतिहासिक असा ठोस आधार नाही. हा श्रद्धेचा भाग असू शकतो. वाचकांनी आणि विशेषत: पुरातत्व व इतिहासाच्या अभ्यासकांनी वरील आख्यायिकेवर विश्वास ठेवावाच असा आग्रह नाही परंतु त्याचा चिकत्सकपणे अभ्यास करणे तितकेच आवश्यक आहे.

इ.स. पूर्व २७२ ते २३१ या काळात सम्राट अशोकाचे साम्राज्य वऱ्हाड प्रांतावर होते. म्हणजेच चिखलदरा अशोकाच्या साम्राज्यार्तंगत होता असे म्हणता येते. अशोकानंतर महाराष्ट्रातील आद्यानृपती सातवाहनांच्या कृपाछत्राखाली हा प्रदेश होता. त्यानंतर वाकाटक व राष्ट्रकूट राजघराण्याच्या राज्याचा एक प्रदेश म्हणून वऱ्हाड त्यात होता. वाकाटकाच्या आद्य राजधान्या पुरीका व चनका ह्याच प्रदेशातील, हयाशिवाय भातकुली, सालबर्डी, येथे आजही वाकाटककालीन आणि अचलपूर, देऊळवाडा येथे राष्ट्रकटांचे पुरावशेष बघावयास मिळतात. कलचुरी आणि चालुक्य राजघराण्याच्या साम्राज्यात काही काळ हा प्रदेश होता. त्यानंतरच्या देवगीरीच्या यादवांच्या साम्राज्यातही वऱ्हाडचा समावेश होता त्याकाळातील निर्देशक पुरावे म्हणून नांदगांव खंडेश्वर येथील मंदिर, खोलापूर, ऋणमोचन, आणि तळेगांव दशासर येथील मूर्तीशिल्प यांचा उल्लेख करता येतो.

## मुसलमानी अमल –

जेव्हा अल्लाउद्दीन खिलजीने देवगिरीवर चाल केली त्या मोहीमेत अल्लाउद्दीन दोन दिवस ह्या प्रदेशात म्हणजेच एलिचपूर (अचलपूर) येथे होता असा उल्लेख मिळतो. दक्षिणेतील मोहीम यशस्वी करुन दिल्लीत परतल्यावर त्याने फिरोजशहा खिलजी यास ठार मारले व स्वत: अल्लाउद्दीन इ.स.१२९६ मध्ये दिल्लीच्या तख्तावर आरुढ झाला.

त्यावेळेपासून नागपूरकर भोसल्यांची अल्पकाळ राजवट वगळता इ.स.१८५३ पर्यंत हा प्रदेश मुसलमानी अमलाखाली होता. ह्या काळात वऱ्हाडची राजधानी एलिचपूर (अचलपूर) असली तरी, साम्राज्य सरंक्षणाचे महत्तम कार्य गावीलगड किल्यातूनच होत होते.



# ४. इतिहास

गाविलगड हा गडकिल्ला संरक्षणाच्या दृष्टीने मजबूत, सहज मान्याची जागा नसल्यामुळे सर करण्यास अवघड आणि म्हणून संरक्षणाच्या दृष्टीने प्रसिद्ध होता. मेळघाटच्या डोंगराळ आणि बिकट अश्या भूभागात तो असल्यामुळे शत्रूस तोफगाडया आणि अन्य अवजड युद्धसामुग्री किल्यालगत नेणे कठीण. विदर्भाच्या विरतापूर्वक आणि तेजस्वी इतिहासात गाविलगडचे नांव सुवर्ण अक्षरांनी लिहावे अशीच त्याची महिमा आहे. विदर्भाच्या इतिहासात गाविलगड अजरामर आहे. हा किल्ला केंद्र शासनाच्या पुरातत्त्व विभागाचे संरक्षित स्मारक आहे. परंतु आज तो दुर्लक्षीत असाच आहे. किल्याची बरीच पडझड झाली आहे. असे असले तरी आपल्या दिव्य, तेजस्वी, आणि स्फूर्तीदायक इतिहासाची अजयता आणि प्रचंडतेची साक्ष देण्याकरिता आजही उन, वारा पाऊस याचा मारा सहन करीत मोठ्या डौलात उभा आहे. आणि म्हणूनच हया किल्याविषयी सहज सुचते आणि वाटते की ''गडात गड गाविलगड, बाकीचे तर केवळ गडच आहेत.''

गाविलगडचे मूळ बांधकाम येथील गवळी राजाने (यादवाने)सर्वप्रथम इं.स. १२ व्या शतकात मातीच्या भिंतीचा परकोट असलेला किल्ला उभारला. हा गवळी राजा इ.स. १२ व्या शतकातील देवगिरीच्या यादव घराण्यातील असावा आणि म्हणूनच ह्या किल्याचे मूळ नाव ''गाविलगड ''होते असा जुन्या गॅजेटीयरमध्ये उल्लेख मिळतो. आजही ह्या परिसरात गवळी लोकांची संख्या बरीच आहे. आज मातीच्या भिंती असलेल्या किल्याचे अवशेष तिथे नाहीत जे अवशेष बघावयास मिळतात ते इ. स. १४२५ मधील आणि त्यानंतरचे पाषाणात बांधकाम असलेल्या किल्ल्याचे. हा किल्ला मुलकी आणि लष्करी ह्या दोन्ही उद्देशानी परिपूर्ण असा सुसज्ज बांधला आहे.

**बहमणी –**

इ.स. १५ व्या शतकात वऱ्हाडातील मुसलमानी सत्तेस खेरला येथील राजापासून विशेष भीती होती, हया शिवाय उत्तर हिंदूस्थानातून दक्षिणेस स्वाऱ्या

करण्याचा त्यावेळचा हमरस्ता सातपुडा ओलांडून गाविलगड मार्गी वऱ्हाडातुनच होता हे अल्लाउद्दीन खीलजीच्या वऱ्हाडवरील स्वारीवरुन लक्षात येते. त्यामुळे बहामणी बादशहा अहमदशहा ने राज्य सुरक्षिततेक़रिता त्याने स्वत:चे देखरेखी खाली गाविलगड हया गडकिल्याची उभारणी केली आणि त्याची युध्दविषयक दृष्टीने परीपूर्ण अशी बांधणी करुन आपल्या उत्तर सरहद्दीचा पक्का बंदोबस्त केला.

अवगत ऐतिहासिक पुराव्यावरुन हा किल्ला बहमणी घराण्यातील नववा राजा अहमदशहा वली याने इ.स. १४२५ मध्ये बांधल्याचा उल्लेख फेरीस्ता लिखीत ''तारीख-ए - फरीस्ता ''हया ग्रंथाच्या प्रथम खंडात मिळतो. त्यानंतर इ.स. १४८८ मध्ये बेरारचा पहिला स्वतंत्र राजा इमादशाही घराण्यातील मूळ पुरुष फत्तेउल्ला इमादअुलमुल्क यांने त्याची दुरुस्ती केली व विस्तार केला. इ.स. १५७७ मध्ये निजामशाही कारकिर्दीत सैयद मुर्तझा सबझावरी याच्या स्वामित्वाखाली बहीरामखान नावाच्या सरदाराने पुन्हा दुरस्ती केली.

बहमणी घरण्यातील नववा सुलतान शहाबुद्धीन अहमदशहा याच्या पूर्वीच्या आठ सुलतानांची नावे फेरीस्ता लिखीत 'तारीख - ए फरीस्ता' हया ग्रंथात पुढील प्रमाणे मिळतात. बहामणीचा शासनकाळ इ.स. १३४७ ते १५३८ पर्यंत समजला जातो. इ.स. १४९० ते १५२२ या काळात बहमणी राज्याचे पांच तुकडे होऊन पाच स्वतंत्र राज्ये अस्तित्वात आली. वऱ्हाडात इमादशाही स्थापन होऊन त्याची राजधानी एलिचपूर (अचलपूर) होती.

## सुलतान अहमदशहाच्या पूर्वीचे आठ सुलतान

| | |
|---|---|
| १. सुलतान अल्लाउद्दीन हसन बहमणशहा | इ.स. १३४७ ते १३५८ |
| २. सुलतान मोहमदशहा (पहिला) | इ.स. १३५८ ते १३७५ |
| ३. सुलतान अल्लाउद्दीन मुजाहिद | इ.स. १३७५ ते १३७८ |
| ४. सुलतान दाऊज अल्लाउद्दीन (पहिला) | फक्त एक महिना राज्य केले त्यानंतर त्याचा खून झाला. |

५. सुलतान मुहम्मदशहा (दुसरा) — इ.स. १३७८ ते १३९७
६. सुलतान गयाउद्दीन (धियाउद्दीन) — एक महिना वीस दिवस राज्य त्यानंतर बंदिवासात.
७. सुलतान शमसुद्दीन दाउद — सहा महिने.
८. सुलतान ताजूद्दीन फिरुजशहा — १३९८ ते १४२२
९. सुलतान शहाबुद्दीन अहमदशहा बहमणी — इ.स. १४२२ ते १४३६

अहमदशहा बहमणी सुलतान पदावर आरुढ झाल्यावर त्याच्या आदेशानुसार खान-ए- आजम अब्दूल लतीफ याने एलिचपूरला मुक्काम करुन गाविलगड किल्याचे निर्माण कार्य पूर्ण केले असा फेरीस्ता उल्लेख करतो.

अहमदशहाने गावीलगडची निर्मिती केली आणि तो संरक्षणाच्या दृष्टीने मजबूत आहे हे ऐकून माळव्याचा राजा हुशंगशहा यास अहमदशहापासून धोका वाटू लागला . त्यास आपले राज्य टिकविणे अशक्य वाटू लागले. म्हणून तो अन्य राजांशी संधान साधू लागला त्याचप्रमाणे खेरला येथील नरसिंगराय यास आपले सार्वभौमत्व कबूल करण्याबद्दल निरोप पाठविला परंतु मानी नरसिंगरायाने त्यास नकार कळविताच अहमदशहाच्या त्यावेळच्या सुस्तीमुळे हुशंगशहाने संधी साधून नरसिंगरायवर चाल करुन खेरला किल्यास वेढा दिला. आणि इ.स. १४३३ मध्ये नरसिंगरायास ठार मारुन खेरल्याचे राज्य आपल्या राज्यास जोडले. यावरून गाविलगडचा केवढा वचक शेजारी राजांवर पडला होता हे दिसते.

## इमादशाही –

इ.स. १५ व्या शतकापर्यंत बेरार-प्रदेश (वऱ्हाड) बहमणी राज्याचाच एक भाग होता. त्याचा मुख्य सेनापती खान- ए-जहान हा होता. त्याच्या सेवेत एक हिंदूचा मुलगा होता. (काही इतिहासकारांच्या मते ब्राम्हणाचा मुलगा )तो विजयनगर येथील रहिवासी असून आपल्या धन्याच्या हुकमाने वागणारा हा प्रामाणिक मुलगा खान-ए-जहान याच्या मृत्यूनंतर बहामणी राज्याचा मुख्य सेनापती बनला. त्यानंतर त्याने त्याचे हिंदू नांव बदलवून 'फत्तेउल्ला इमाद उल्लमुल्क' हे नाव ठेवले. (किताब घेतला)

बहमणीच्या उतरत्या कालखंडात, बहमणी राजवटीतून अलग होऊन बेरार प्रदेशात 'ईमादशाहीची 'स्थापना केली आणि इ.स. १४९० मध्ये गाविलगडच्या गादीवर धार्मिक रीतीने बसला. ह्यानंतर हे इमादशाहीचे राज्य सुमारे ९० वर्ष वऱ्हाडात नांदले..

इमादशाहीचा संस्थापक फत्तेउल्ला याची वऱ्हाडचा सुभेदार म्हणून नेमणूक अहमदशहा (तिसरा) याने इ.स. १४७१ मध्ये केली होती. त्यावेळी त्याने गाविलगड किल्याची दुरुस्ती करुन किल्याची मजबूती केली. आणि शार्दूल दरवाज्याची उभारणी करुन त्यावर त्याने विजयनगरच्या हिंदू राजाचे 'जयचिन्ह' कोरले. ह्यावेळी गाविलगड हे उत्तर वऱ्हाडचे मुख्य ठाणे होते. ह्या गाविलगडच्या सुभ्यावर फत्तेउल्ला नंतर अल्लाउद्दीन देरिया व बुरहानने राज्य केले.

इ.स. १४७३ -७४ या वर्षात वऱ्हाडांत मोठा दुष्काळ पडला त्यामुळे येथील जनता उदरनिर्वाहाकरिता मोठया प्रमाणात माळवा व गुजराथकडे गेली त्यामुळे हा प्रांत उजाड झाला होता. परंतु काही वर्षानंतर परिस्थितील सुधारणा होऊन मूळचे रहिवासी हळू-हळू परत येऊन पुन्हा वसाहती करु लागले.

फत्तेउल्ला इमाद उलमुल्क नंतर इमादशाहीच्या गादीवर अल्लाउद्दीन ईमादशहा आला त्याने इ.स. १४९५ ते १५१९ पर्यंत राज्य केले त्यानंतर त्याचा मुलगा देरीया (दर्या) हा इ.स. १५२० मध्ये गादीवर बसला. त्याने अमरावती जिल्हयातील दर्यापूर (दर्याबाद) गाव वसविले. दरीयाच्या प्रारंभीचे काही वर्ष शांततेत गेले परंतु पुढे अहमदनगर व विजापूर या दोन राज्यांत लढाई सुरू झाली आणि नेहमीप्रमाणे दक्षिणेतील सर्व राज्ये या लढाईच्या चक्रात सापडली. त्यात वऱ्हाडच्या राजाचा सुध्दा समावेश होता. त्याचा साक्षीदार म्हणून गावीलगड आहेच या लढाईच्या धुमश्चक्रीत देरीयाचा मृत्यू झाला व त्यानंतर बुऱ्हाण इमादशहा गादीवर आला. त्यानेसुद्धा लढाईत भाग घेतला. दरम्यान तुफालखान नावाचा अमीर त्याच्या स्थानी कारभार पाहत होता. लढाईनंतर बुऱ्हानशहा वऱ्हाडात परत आला असता तुफालखानाने त्यास कैद करून नरनाळा किल्यात कोंडून ठेवले आणि आपण स्वत: इमादशाहीच्या गादीवर बसला.

या सुमारास दक्षिणेतील सर्व मुसलमान बादशहानी एकत्र येऊन विजयनगरच्या



लहान मशिद मधील आतील दृष्य



लहान मशिद



उत्तरेकडील प्रथम दरवाजा व तटबंदी



विरभान (बुरुजबंद) दरवाजा

हिंदूराजाच्या विरुद्ध उठाव करुन त्याचे राज्य बुडवावे असा कट रचला. या कटात तुफालखानास सामील होण्याचे निमंत्रण देण्यात आले परंतु त्याचे पाय वऱ्हाडात अद्याप पक्के बसले नव्हते आपण मोहिमेवर गेल्यास बुऱ्हाणची सुटका होऊन तो पुन्हा गादीवर बसेल अशी त्यास भीती वाटत असल्यामुळे तो ह्या मुसलमानी संघात सामील झाला नाही.

काही इतिहासकारांच्या मते बुऱ्हाणशहा अल्पवयी असल्यामुळे त्यास बंदोबस्ताने(नजरकैदेत)नरनाळा किल्यात ठेऊन तुफालखानाने स्वत: राज्य कारभार केला परंतु सदर मत सत्यतेच्या कसोटीवर उतरत नाही. कारण बुऱ्हाण हा अल्पवयी होता तर त्यास नजरकैदेत ठेवण्याचे काहीच कारण नव्हते. बुऱ्हाणशहाच्या नावाने त्यास सहज राज्यकारभार करता आला असता बुऱ्हाण हा अल्पवयी असता तर देरीयाच्या मृत्यूनंतर त्याने अहमदनगर-विजापूर यांच्या लढाईत भाग घेतला नसता हे उघड आहे.

इ.स. १५६५ च्या सुमारास बुऱ्हाणशहा याच्या कैदेचे कारण समोर करुन अहमदनगर आणि विजापूरच्या राजांनी तुफालखानावर चढाई केली परंतु त्यांना योग्य ती खंडणी देऊन आलेल्या संकटातून त्यांने स्वत:ची सुटका करुन घेतली.

इ.स. १५७४ मध्ये अहमदनगरचा निजामशहा मूर्तीजाने वऱ्हाड आपल्या ताब्यात घेण्याच्या दृष्टीने योजनाबद्ध कार्यवाही केली. (मूर्तिजाशहा याच्या नावानेच मुर्तिजापूर हे गांव बसविले होते.) तो तुफालखानाच्या मागे न लागता त्याने एके ठिकाणी तळ दिला आणि वऱ्हाडातील देशमुख, देशपांडे , वतनदार यांना विश्वासात घेऊन त्यांना कुठल्याही प्रकारचा त्रास होणार नाही असे वचन दिले.(मूर्तिजा हा दिवाना म्हणजे वेडा म्हणून प्रसिध्द होता. त्याच्या मूर्खपनाच्या व वेडेपणाच्या बऱ्याच कथा प्रसिद्ध आहेत.) तुफालखानाविषयी रयतेत प्रेम नव्हतेच मूर्तिजाकडून वरील प्रमाणे वचन मिळाल्यावर सर्वच वतनदार निजामशहास अनुकूल झाले. त्यानंतर मूर्तिजाने एलिचपूरावर (अचलपूर) चाल केली मूर्तीजासमोर आपला टिकाव लागणार नाही याची जाणीव होताच, तुफालखान व त्याचा मुलगा समसेर उल-मुल्क मेळघाटातून

पळून जाऊन खानदेशचा राजा अहमदशहा याच्या आश्रयास गेले. परंतू मूर्तीजाने जासूद पाठवून तुफलखानास आपण आश्रय दिल्यास आम्ही तुमचीही गय करणार नाही असा धाक दाखविल्याने तुफालखानास व त्याच्या मुलास वऱ्हाडात परत यावे लागले. त्याप्रमाणे तुफालखान नरनाळा किल्यात येऊन राहिला व त्याचा मुलगा गाविलगड किल्यात येऊन राहिला. त्यानंतर तुफालखानाने अकबर बादशहाकडे मदतीची याचना केली व मी तुमचा नोकर म्हणून वऱ्हाडचा कारभार चालवीन असे कळविले. अकबराने याचा फायदा घेऊन निजामशहा मूर्तिजास तसे पत्र लिहिले परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही. निजामाने दोन्ही किल्यास (गाविलगड व नरनाळा) वेढा देऊन तुफालखान आणि बुऱ्हाण इमादशहासह त्याच्या सर्व नातलगांना कैद केले तसेच समसेर उलमुल्क यास सुद्धा कैद करण्यात आले. अश्याप्रकारे निजामशहाने सुमारे ४० लोकांना कैद केले आणि शेवटी ह्या सर्वांचा कैदेतच अंत झाला. त्यांच्या मृत्यु विषयी निरनिराळे प्रवाद आहेत.

अशाप्रकारे इ.स. १५७२ मध्ये वऱ्हाडच्या पहिल्या व शेवटच्या स्वतंत्र राज्याचा अंत झाला व वऱ्हाड म्हणजेच गाविलगड व नरनाळा हे दोन्ही किल्ले निजामशाहीत सामील झाले.

The Copper coin Fatteh Ulla Imad Shah (1483)
The founder king of Imads dynasty of Gavilgarh





**Front side**
**"Fatteh Ullah Imad Almulk Khald kar viya Illahu"**

**Means May Allah bring prosperity to Fatteh ullah.**

**Back Side**
**" Zarb Darusaltant Gawil"**

**Means this copper coin is the product of Gawilgarh coinage factory, existing in imad rule.**

## निजामशाही –

निजामशाहीत सय्यद मूर्तिजा सबजाबरी याच्या नेतृत्वाखाली बैरामखान हा गाविलगडचा नायक होता आणि मूर्तीजा हा बेरारचा नबाब होता. दरम्यान अकबर बादशाहा हा वऱ्हाडवर स्वारी करणार असे समजताच आणि वऱ्हाडच्या उत्तर सरहद्दीचा उत्तमप्रकारे बंदोबस्त करावा असा सुभेदाराकडून हुकूम प्राप्त होताच. सय्यद मूर्तिजाने बहिरामखान किल्लेदाराच्या मदतीने गाविलगड किल्याची दुरुस्ती केली. त्याकरिता बरेच धन खर्च करण्यात आले. बहिरामखानाच्या मार्गदर्शनाखाली हे काम पूर्ण झाले त्याची नोंद म्हणून त्याने पश्चिमेकडील एका बुरजावर आपले नाव कोरले नबाब मूर्तिजा निजाम याने हिजरी सन ९८५ (इ.स. १५७७)मध्ये स्वतःच्या व रयतेच्या संरक्षणार्थ ह्या किल्याची पुन्हा दुरुस्ती केली.

## मोगल–

इ.स. १५९७ च्या जानेवारी महिण्यातील २६ तारखेस मोगल आणि आदिलशाही सैन्यात वऱ्हाडात जंगी लढाई होऊन त्यात मोगली लष्कराचा मोड झाला आणि आदिलशाही लष्कराने मोगली सैन्याचा आकोट तालुक्यातील शहापूरपर्यंत पाठलाग केला परंतु मोगल सेनापती खानखाना याचा पूर्ण बिमोड करता आला नाही. पुन्हा काही दिवसातच खानखानान आणि आदिलशहाचा सरदार सोहेलखान यांच्यात लढाई जुंपून त्यात खानखानानचा विजय झाला. विजयानंतर त्याने आपला मोर्चा नरनाळा व गाविलगड किल्ले ताब्यात घेण्याकरिता वळविला आणि त्याप्रमाणे त्याने गाविलगडावर सैन्य पाठविले. खानखानान याचे सदर कृत्य मुराद यास पसंत पडले नाही. हया संबंधी त्याने अकबराकडे तक्रार केली तक्रारीवर विचार करून अकबराने वऱ्हाडच्या मोहिमेतून खानास दिल्लीस परत बोलाविले.

अकबराने सुरळीत राज्य व्यवस्थेकरिता आपल्या राज्याचे एकंदर पंधरा सुभे केले होते. त्यापैकी वऱ्हाड हा एक सुभा होय त्यात तेरा सरकार (जिल्हे) चा समावेश होता. हया सुभ्यातून दरवर्षी पावनेदोन कोटीचे उत्पन्न मिळत असे त्यामुळे सर्वांच्याच नजरा वऱ्हाड प्रांतावर असत. वऱ्हाडच्या सुभ्याचा विस्तारही बराच मोठा होता. त्याची

हद्द दक्षिणेस गोदावरी पर्यंत तर पूर्वेस आष्टी, आर्वी ते पवनारपर्यंत होती. हयापैकी गाविल सरकार मोठा असून महत्वाचा होता.

**वऱ्हाड सुभ्याचे खालील प्रमाणे सरकार होते.**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १. | गावेल (गाविलगड) | ७. | मेहकर | | |
| २. | पेनार (पवनार) | ८. | बैतुलवाडी | | |
| ३. | खेरला | ९. | कळंब | | |
| ४. | माहूर | १०. | माणिकगड | | |
| ५. | नरनाळा | ११. | वाशीम | | |
| ६. | पाथरी | १२. | रामगड | १३. | पल्याळे |

गाविलगड येथे पोलादी शस्त्रांचा कारखाना होता आणि येथील शस्त्र युध्दाकरिता उत्तम म्हणून प्रसिद्ध होती. सर्व सरकारात गाविलचे सरकार विस्ताराने मोठे असून त्यात चार परगणे होता. मेळघाट परगण्यातून गोंड,कोरकू , गवळी, लोकांचे सुमारे १०० घोडेस्वार व २,००० पायदळ सैन्य गावेल व नरनाळा सरकारच्या सेवेसाठी सदैव तयार असत.

हया काळात अमरावती शहरास महत्वाचे स्थान नसुन ते साधे परगण्याचे ठिकाण सुद्धा नव्हते.

इ.स. १५९८ मध्ये बुऱ्हाणपूरच्या मिराज मुहमंदशहा फारुकी ने गाविलगड किल्ला आपल्या ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला परंतु अहमदनगरच्या राजाने त्यास पराजीत करुन त्यास सीमे बाहेर हाकलून लावले. मुरादच्या मृत्यूनंतर अकबराने अहमदनगरवर विजय मिळविला आणि अहमदनगर सोबतच खानदेश व बेरारच्या सुभेदारीवर दानियालची नेमणूक केली सुद्धा त्या अर्थानेच गाविलगड मोगलांच्या ताब्यात गेला. परंतु अल्पावधीतच मलिक अंबरने बेरार प्रांत जिंकून गाविलगड निजाम राज्यात समाविष्ट केला. शहाजहान याच्या कार्यकाळात पुन्हा बेरार प्रांत आणि त्या अर्थानेच गाविलगड सुद्धा मोगलांच्या ताब्यात गेला.

१६३६ मध्ये मोगलांच्या दक्षिणेतील चार सुभ्यांपैकी बेरार प्रांत हा एक प्रमुख

प्रांत होता. त्याची राजधानी एलिचपूर (अचलपूर)हीच होती आणि त्यात गाविलगड किल्ला हा संरक्षणाच्या दृष्टीने प्रमुख होता. हया कालावधीत मराठयांनी बेरार प्रांतावर अनेकदा लढाया केल्या आणि बरेच लगान सुद्धा गोळा केले. इ.स. १६८० मध्ये संभाजीने आणि इ.स.१७१८ मध्ये राजारामाने देवगडच्या गोंडराजाच्या मदतीने संपूर्ण वऱ्हांडप्रांतावर आपला दरारा बसविला होता.

गाविलगड किल्ला वऱ्हाडचे इतिहासात बराच प्रसिद्ध आहे. त्याचे महत्व ऐवढे की, गाविलगडावर ज्याची मालकी त्याचा वऱ्हाड प्रांत समजला जात होते. तसेच गाविलगड जिंकल्याशिवाय वऱ्हाड जिंकला असे समजले जात नसे. सुरक्षिततेच्या दृष्टीने सुध्दा त्याची महती बरीच होती. नागपूरकर भोसल्यांचा खजीना, जडजवाहीर ह्याच किल्ल्यात सुरक्षितपणे ठेवले जात असे. आणि म्हणूनच इंग्रजा सोबत झालेल्या तहाच्या वेळी नागपूरकर भोसल्यांनी नरनाळा व गाविलगड किल्यांचा ताबा सोडला नव्हता. त्यामुळे वऱ्हाड हा सुद्धा 'सुभे गाविलगड' किंवा गाविल या नावाने ओळखला जात असे.

## नागपूरकर भोसले -

राजारामाच्या कारकीदीत नागपूरकर भोसले परसोजी यांने स्वप्रयत्नाने गोंडवाना व बेरार प्रांतावर आपले शासन स्थापित केले. त्यामुळे राजारामाने त्यास 'सेना साहेब सुभा 'हा किताब देऊन हा प्रदेश त्याच्या ताब्यात दिला त्यानंतर आलेला 'सेना साहेब सुभा 'कान्होजी भोसले याच्या काळात इ.स. १७१८ मध्ये वऱ्हाड प्रांतातून चौथाई व सरदेशमुखी वसुलीचे अधिकार भोसल्यांना प्राप्त झाले. कान्होजी नंतर आलेल्या रघूजी भोसल्याने वऱ्हाडात मराठ्याची सत्ता बरीच वाढविली व सुव्यवस्थित राज्यव्यवस्था केली.

इ.स. १७३८ मध्ये रघूजी भोसल्याने ऐलिचपूर येथील सुभेदार शुजातखान वर चाल करुन त्याचा पराभव केला आणि नरनाळा व गाविलगड हे दोन्ही किल्ले आपल्या ताब्यात घेतले परंतु काही वर्षातच पुन्हा हे दोन्ही किल्ले निजामाच्या ताब्यात गेले.

इ.स. १७४४ ते १७५१ मधील पेशवे-निजाम यांच्यातील भांडणाचा फायदा घेऊन पहिल्या रघूजी भोसल्यांनी निजामाच्या ताब्यातील नरनाळा व गाविलगड आपल्या ताब्यात घेतले आणि तेव्हा पासून हे दोन्ही किल्ले बराच काळ भोसल्यांच्या ताब्यात राहिले. त्यापैकी भोसल्यांनी गाविलगड कडे विशेष लक्ष देऊन ते बंदोबस्ताचे ठाणे केले त्याकाळी संकटसमयी भोसले कुंटुबातील माणसे व जडजवाहीर, गाविलगडात ठेवीत असत.

## मुधोजीचा पराक्रम -

नरनाळा व गाविलगड हे दोन्ही किल्ले निजामाचे ताब्यात असतांना रघूजी भोसले यांनी पहिल्या राणीचा पुत्र चंद्रपूरचा सेनाधुरंधर मुधोजी भोसले यास गाविलगड किल्ला सर करण्यास पाठविले होते. प्रयत्नाची पराकाष्टा करुन मुधोजीने गाविलगड शके १६७४ इ.स. १७५२ मध्ये सर केला आणि तेथील बंदोबस्त करुन मुधोजी नागपूरकडे परत येत असतांनाच इ.स. १७५५ ला रघूजींच्या मृत्यूचे त्यास वर्तमान समजले. त्यावेळी धाकटया राणीचे पुत्र जानोजी व सांबाजी रघुजीजवळ होते. मुधोजी हा पहिल्या राणीचा पुत्र वडीलधारी म्हणून त्याने सूर्जी अंजनगांव येथे क्रियाकर्म आटोपले.

रघुजीनंतर मुधोजीने पहिल्या राणीचा पुत्र या नात्याने वडीलपणा पुढे करुन सेना साहेब सुभ्याचे पद मिळविण्याचा मनसुबा रचला. जानोजीस हे कळताच त्याने आपली बाजू मजबूत करण्यास सुरवात केली. गाविलगडचा किल्ला मुधोजीने नुकताच जिंकला होता. तो आपल्या ताब्यात घेण्याचा जानोजीने कट रचला त्या करिता जयाजीभाई नावाच्या इसमास मुधोजीकडे पाठविले. त्याने रस्त्यातच मुधोजीची भेट घेऊन आपण जानोजीच्या विरुध्द आहोत असे खोटेच सांगून मुधोजीचा विश्वास संपादन केला. मुधोजीने त्याची गाविलगडच्या किल्यावर किल्लेदार म्हणून नेमणूक केली. गाविलगड ताब्यात येताच जयाजीने आपले खरे रुप प्रगट केले. आणि किल्ला आपल्या ताब्यात आल्याचे जानोजीस कळविले आणि अशा प्रकारे कपटाने जानोजीने मुधोजीकडून गाविलगडचा ताबा घेतला. हया सर्व घटनांना मुकनायक गाविलगड साक्षी आहेच.

वऱ्हाडच्या इतर भागाप्रमाणे गाविलगड व त्यालगतचा प्रदेशास साठ-चाळीसीचा तह लागू नव्हता. येथील सर्व उत्पन्न भोसल्यांना मिळत असे. पहिल्या रघुजीच्या काळात नरनाळा व गाविलगड हया दोन्ही किल्याखालील प्रदेश स्वतंत्रपणे भोसल्यांच्या ताब्यात होता.

इ.स. १७६९ मध्ये माधवराव पेशवा वऱ्हाडवर चालून येणार हे कळताच जानोजीने, भोसल्यांचा कुंटूब कबीला आणि जडजवाहीर गाविलगड किल्यात आणून ठेवला होता आणि त्याच्या संरक्षणासाठी जानोजीचा नागपूरचा सुभेदार नरहर बल्लाळ यास पांच हजार सैन्यानिशी गाविलगडवर ठेवले होते. ह्यावरून स्पष्ट होते की, गाविलगड हा संरक्षणाच्या दृष्टीने भक्कम, मजबूत व किती महत्वाचा किल्ला होता.

## मुधोजी-दर्याबाईची गाविलगडात भेट -

इ.स. १७७३ च्या ऑगष्ट महिन्यात निजामाचा दिवाण रुकूनुउद्दोला आणि मुधोजीचा सावत्र भाऊ सांबाजी यांने मुधोजीच्या ताब्यातील एलिचपूरास वेढा दिला त्यावेळी मुधोजीच्या बाजूने इस्माइलखान व गाविलगडचा किल्लेदार झामसिंग हे होते. झामसिंगाने शत्रुसैन्यांवर छापे घालून त्यांना बराच त्रास दिला; तसेच इस्माईलखाने सुद्धा मोठी कामगिरी केली. शेवटी सप्टेंबर १७७३ ला मुधोजी व सांबाजी याच्यात समेट झाला. हयात सेना साहेब सुभ्याचे पद सांबाजीकडे कायम ठेवून अमल मात्र दोघांनीही सारखा करावा असे ठरले. दरम्यान मुधोजीने गाविलगडात बंदिस्त असेलेल्या जाणोजीची राणी दर्याबाईची गाविलगडात भेट घेतली. यावरून भोसल्यांचे गाविलगड हे बंदोबस्ताचे उत्तम ठिकाण होते हे स्पष्ट होते.

## महिपतराव दिनकर यांस गाविलगडात कैद -

महीपतराव दिनकर हा इ.स. १७७५ च्या पाचगावंच्या (नागपूर जवळील) लढाईत सांबाजीच्या पक्षात होता. त्यानंतर तो मुधोजीच्या पक्षात आला, परंतु इ.स. १७७५ मध्येच महिपतराव दिनकर याजवर मुधोजीची इतराजी होऊन त्यास गाविलगड

किल्यात कैद केले.

गाविलगड इ.स. १८ व्या शतकाच्या प्रथम चरणापासून ते १८२२ पर्यंत भोसल्यांकडे आलटून पालटून राहिला. भोसल्यांनी या किल्याचा दुसरा कोट ज्यास बाहेरील किल्ला म्हणून ओळखला जातो त्या परकोटाची भिंत बांधली आणि त्यावर बालबोध लिपीत लेख कोरला परंतु तो आता अस्पष्ट असल्यामुळे वाचता येत नाही.

## किल्लेदार बेनिसिंग –

भोसलेकाळात गाविलगड आणि मेळघातील इतर लहान-मोठे किल्ले बेनीसिंग या रजपूताच्या ताब्यात (देखरेखी) होते. त्याने प्रत्येक किल्यावर आपल्या विश्वासातील किल्लेदार नेमले होते बेनीसिंगचा मूळपुरुष झामसिंग यास पहिल्या रघुजीने बंगालातून आणले होते. त्याचा शूरपणा व प्रामाणिपणा बघून रघुजीने मेळघाटातील आणि सातपुडयाच्या उत्तरेकडील सर्व किल्याची जबाबदारी झामसिंगाकडे सोपविली होती. झामसिंगाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा प्रमोदसिंग याची नेमणूक करण्यात आली. आणि त्यानंतर मेळघाटातील सर्व किल्याची देखरेख व संरक्षणाची जबाबदारी बेनिसिंगाकडे आली बेनिसिंग हा शूर व कर्तबगार असल्यामुळे त्याची गाविलगड किल्याचा मुख्य अधिकारी म्हणून नेमणूक करण्यात आले. तो गाविलगडातच सहकुंटूब राहत असे. त्याच्या आश्रयाने इतर रजपूत अधिकारी सुद्धा किल्यातच राहत. हल्ली बेनिसिंगाचे वंशज भैसदेही (म.प्र.) येथे राहतात.

## काशी कुंटुंबीयांना कैद –

ह्याच गाविलगडात इ.स. १७९० मध्ये प्रसीद्ध मुत्सद्दी व्यंकटराव काशी, लक्ष्मणरावजी आणि त्यांचा भाचा दौलतराव नरसिंह हे भोसल्यांना फंदफितूरी करून शिंद्याकडे वळवितात, अशी पेशव्यांना शंका आल्यामुळे नाना फडणविसाच्या सल्याने त्यांना कैद करून गाविलगडात ठेवले होते.

## दुसरे इंग्रज-मराठा युद्ध आणि गाविलगडाचे महत्व-

इ.स. १८०३ च्या दुसऱ्या इंग्रज-मराठा युद्धाच्या वेळी भोसल्यांनी निजामाच्या राज्यात धुमाकूळ माजविला असल्यामुळे निजामाच्या राज्याचे रक्षणार्थ आणि भोसल्यांच्या बंदोबस्ताकरिता इंग्रज अधिकारी वेलस्ली वऱ्हाडवर चालून आला. त्यापूर्वी व्यंकोजी उर्फ मन्याबापू याच्या नेतृत्वाखाली नागपूरकर भोसल्यांनी योजना आखून गाविलगड किल्याच्या पलीकडेच इंग्रजाना अडवावे असा बेत ठरला. तर इंग्रजांकडून स्टिव्हनसन याने बऱ्हानपूर हस्तगत करून मेळघाटातून परभारे जाऊन गाविलगडास वेढा द्यावा असा वेलस्लीच्या सल्याने बेत रचण्यात आला. गाविलगड हे भोसल्याचे मुख्य आणि संरक्षणाच्या दृष्टीने मजबुतीचे ठिकाण, गाविलगडास वेढा पडताच भोसले तिकडे येतील अशी वेलस्लीची योजना होती. ह्यावरून गाविलगडचे त्यावेळचे राजकीय महत्व अन्यन्य साधारण होते असे लक्षात येते. शेवटी दोन्ही सैन्याची गाठ अडगाव येथे पडली. दोन्ही सैन्यात घनघोर युद्ध होऊन त्यात मराठ्यांना माघार घ्यावी लागली.

अडगावच्या लढाईनंतर मराठा सैन्याची पांगापांग झाली आणि वेलस्लीने भोसल्यांचा मुख्य किल्ला गाविलगड घेण्यास तिकडे कुच केली. बेनिसिंग व त्याचे राहीलेले सैन्य किल्यात येऊन बंदोबस्ताने होते. वेलस्लीने एलिचपुरच्या नबाबाच्या मदतीने वेढ्याची तयारी सुरू केली. अडगावच्या लढाईत भोसल्यांच्या सर्व तोफा इंग्रजाच्या हाती सापडल्यामुळे त्यांचा उपयोग ह्या वेढ्यात करण्यात त्यांना मदत झाली.

## गाविलगडची लढाई- ता. १३, १४-१५ डिसेंबर १८०३ -

वेलस्लीच्या नेतृत्वाखाली ता. ७ डिसेंबर, १८०३ रोजी गाविलगडच्या पायथ्याशी देवगाव नावाच्या खेड्याजवळ इंग्रजी सैन्यानी तळ दिला. देवगावच्या बाजूने किल्ला उंच असल्यामुळे किल्यावर मारा होणार नाही हे वेलस्लीने जाणताच त्याने स्टिव्हनसन यास किल्याच्या उत्तरेकडे पाठविले. स्टिव्हनसन याने तीस मैलाचा चक्कर घेऊन ता. १२-१२-१८०३ रोजी उत्तरेकडील लंबाडा या खेड्याजवळ आपला

तळ दिला.

ता. १२ रोजी स्टिव्हनसनने उत्तरेकडील दरवाज्यावर मारा करण्याकरिता मोर्चे बांधून तयार केले व दुसरे दिवसी वेलस्लीने दक्षिणेकडून पीरफते या दरवाजावर तोफा चालवून हल्ला करावा असा उभयतांचा संकेत ठरला.

ता. १३ चे सकाळपासून इंग्रजांनी किल्याच्या दोन्ही बाजूने तोफांचा मारा सुरू केला. परंतु वेलस्लीकडील हल्ल्याचा विशेष उपयोग झाला नाही कारण किल्याच्या उंची मुळे तोफा टेकडीवर चढविणे कठीण झाले होते. पिंतळी लहान तोफा टेकडीवर चढविल्या परंतु त्या लहान असल्यामुळे त्यांचा जोर चालेना व दरवाजा आणि तटबंदी पडेना. परंतु या माऱ्यामुळे किल्यावरील लोकांचे लक्ष उत्तरेकडून दक्षिणेकडे वेधल्या गेले व स्टिव्हनसन यास त्यामुळे बरीच मदत झाली. स्टिव्हनसनचे माऱ्याचे जागेवरून मात्र चांगला उपयोग झाला. असे म्हटले जाते की एलिचपूरच्या नबाबाच्या पदरच्या एका गोंडाने वेलस्लीस सांगतले की तुम्ही काही केले तरी किल्यावर मारा लागू होणार नाही व तुम्हास माऱ्यांची जागा कधीच सापडणार नाही. म्हणून वेलस्लीने त्यास विश्वासात घेऊन उत्तरेकडील माऱ्याची जागा समजून घेतली. तिकडे रस्ता मुळीच नव्हता परंतु गोंडाच्या मदतीने स्टिव्हनसन यास त्याच कारणाने तीस मैलांचे चक्कर घेऊन पाठविले आणि माऱ्याची जागा उत्तम मिळाल्यामुळे किल्ला हाती येण्यास मदत झाली.

तारीख १४ चे सायंकाळपर्यंत उत्तरेकडील दरवाजावर बराच मारा होऊन किल्यास भगदाडे पडली व त्यातून हल्ला करण्याची तयारी रात्रभर स्टिव्हनसन याने करून ठेवली.

केनी नावाच्या इंग्रज सरदारांच्या हाताखाली मद्रासचे हिंदी पायदळ व स्टिव्हनसनचे हिंदी लष्कर व काही इंग्रज पलटणी यांच्याकडून ता. १५ रोजी सुमारे सकाळी १० वाजता हल्यांस उत्तरेकडून सुरूवात झाली. आणि इंग्रजाकडील लष्कराचे पाडलेल्या तटबंदीतून आत घुसून आतील लष्कराने लढाई सुरू केली.

दक्षिणेकडे वेलस्लीने सैन्याच्या दोन तुकड्या करून स्वत: दक्षिणी पीरफते

दरवाज्यावर राहिला व कर्नल चार्मस यास वायव्येकडील खुनी दरवाज्यावर पाठविले. परंतु त्यांना फारसे यश आले नाही. किल्यात किंवा दरवाज्यास भोक पडेना व हल्ला करण्यास संधी येईना तरीही त्यांनी तोफाचा मारा सुरूच ठेवला. त्यामुळे आतील फौज तिकडे गुंतुन उत्तरे कडील दरवाज्यावर जोर कमी होऊन केनीच्या हल्यास मदत झाली.

केनीच्या हल्याने किल्यातील लष्कर हटून वायव्येकडील खुनी दरवाजा उघडून बाहेर पडण्याचा बेत करू लागले आणि दरवाजा आयताच उघडल्यामुळे चामर्स यास किल्यात घुसण्याची नामी संधी मिळाली. केनीला पहिल्या हल्यात यश मिळाले परंतु किल्यातील रजपूत व मराठे निकराने लढले, असे म्हटले जाते की, कदाचीत मराठे आणखी नेट धरते तर केनीच्या लष्करास पंचाईत पडली असती म्हणून केनीने वायव्येकडील खुनी दरवाजा उघडून चार्मस यास आत घेण्यास एक टोळी पाठविली. दरम्यान चामर्सची टोळी वायव्य दरवाजाजवळ येऊन पोहचली होती. चार्मस याने पळणाऱ्या लोकांची कत्तल करुन आतील लष्करास ऐनवेळी मदत पोहचवीली.

वरील कामगीरीमुळे इंग्रजांचे फक्त अर्धेच कार्य पुर्ण झाले किल्यास आतील व बाहेरील अश्या दोन तटबंद्या असून किल्ला दुहेरी बंदोबस्तात होता. इंग्रजाच्या ताब्यात बाहेरचा किल्ला आला असला तरी आतील किल्यास तोफा आणून भोक पाडणे किंवा दरवाजा फोडणे सहज कार्य नव्हते. दिल्ली दरवाजा हा फारच मजबुत केलेला व त्यावर बंदोबस्तही खूप होता. किल्लेदार स्वत: व बेनिसिंग हा मुख्य रक्षक जातीने खपत होते.

इंग्रजांना किल्यावर चढून जाण्याशिवाय दुसरा उपाय दिसेना म्हणून शेवटी शिड्या लावून इंग्रजी लष्कर वर चढविले व लष्करांनी हल्ला करुन दरवाजा उघडला. दिल्ली दरवाजा उघडताच भयंकर लढाई झाली. त्यात किल्यातील बरेच लोक मारले गेले व बरेच पळून गेले. शूर किल्लेदार व इनामी बेनिसिंग मात्र अखेरपर्यंत आपल्या थोडया सैन्यासह मरेपर्यंत लढला. दरवाज्यात प्रेतांचा खच पडला खुद्द बेनिसिंगाचे व किल्लेदाराचे प्रेत दरवाज्यातच सापडले.

बाहेरील किल्ला पडताच आणि पुढील परिणाम जाणून अनेक रजपूत स्त्रियांनी जोहार केला. इंग्रजाकडील सुध्दा अनेक सैनिक मारले गेले. खुद्द कर्नल केनी या लढाईत

पडला. त्यास एलिचपूर येथे पुरण्यात आले त्याची कबर हल्लीच्या नगरपालिका कार्यालयाच्या मागे आहे. इंग्रजांना किल्यात बरीच लूट सापडली. या किल्यात भोसल्यांचा बराचसा खजिना राहत असे. त्यातच एक बहुमोल कुराणांची प्रत होती. ती एलिचपूराच्या नबाबास देण्यात आली.

हया लढाईत बेनिसिंग व किल्लेदार फार जहामर्दीने लढले. परंतू त्यांच्या लढण्यात किल्याच्या रक्षणाचा सुव्यवस्थीपणा नव्हता. स्वत:च्या शूरपणाने इतरांना उत्तेजन देण्याचे कार्यही त्यांचेकडून फारसे झाले नाही. बेनिंसिंगाने बघता-बघता दोघांतिघां इंग्रज शिपायांना ठार मारले परंतु त्यांचे प्रयत्न एकांगी पडले. तसेच गाविलगडचा वेढा उठविण्याकरिता बाहेरुन भोसल्यांनी काहीच मदत केली नाही . आतील शिंबदी वाढवून अगर अन्नाचा पुरवठा करून वेढा जास्त दिवस टिकविण्याचीही खटपट झालेली दिसत नाही.

गाविलगड इंग्रजाच्या ताब्यात येताच १७ डिसेंबर १८०३ रोजी देवगांव येथे वाटघाटी होऊन तहावर सह्या झाल्या या तहानुसार वऱ्हाडावर असलेली भोसल्यांची वतनदारी काढून टाकण्यात आली. वऱ्हाड निजामाकडे आला परंतु गाविलगड आणि नरनाळा हे दोन्ही किल्ले आणि मेळघाटचा भाग मात्र भोसल्यांच्या ताब्यात राहिला.

त्यानंतर ६.१.१८१८ रोजी आप्पासाहेब भोसले यांच्या सोबत झालेल्या तहाने गाविलगड आणि नरनाळा हे दोन्ही किल्ले इंग्रजाच्या ताब्यात देण्याचे ठरले. त्याप्रमाणे इ.स. १८२२ मध्ये इंग्रजाने गाविलगडावर आपला ध्वज फडकवून ताबा मिळविला आणि तेव्हापासूनच गाविलगड व नरनाळा हे दोन्ही किल्ले खऱ्या अर्थाने पारतंत्र्याच्या शृंखलेत अडकले गेले.

त्यानंतर इ.स. १८५३ मध्ये दोन्ही किल्यावर ईस्ट इंडिया कंपनीचे स्वामित्व स्थापन करुन हे किल्ले कंपनीच्या राज्यकारभारासाठी मोकळे केले.

त्यानंतर पुन्हा हिंदवी स्वराज्याच्या दृष्टीने हा किल्ला उजेडात आलेला दिसतो. इ.स. १८५७ मध्ये क्रांतीकारी बहादूर तात्या टोपे मध्यप्रदेशात शक्तीशाली होता. म्हणून इंग्रजांनी हा किल्ला त्याच्या ताब्यात जाऊ नये ह्या करिता किल्याची डागडुजी

करुन तटबंदी भक्कम केली.

इ.स. १८६४ मध्ये वऱ्हाड जिल्हाची पूर्नरचना होऊन पूर्व वऱ्हाडचे मुख्य ठिकाण अमरावती आणि पश्चिम वऱ्हाडचे मुख्य ठिकाण अकोला येथे झाले. त्याप्रमाणे नरनाळा पश्चिम वऱ्हाडात आणि गाविलगड पूर्व वऱ्हाडात आला. त्यानंतर पारतंत्र्यांत गेलेले हे किल्ले पुन्हा इ.स. १९४७ मध्ये स्वातंत्र्यांच्या मंगलमय पहाट किरणासोबतच स्वतंत्र झाले.





*The Army of India Medal Awarded for the battles of Gawilghur, Seetabuldee and Nagpore*

# ५. वास्तुशिल्पीय इतिहास

बहमणी साम्राज्यापासून इमादशाही, अहमदनगरची निजामशाही, मोगल नागपूरकर भोसले या राज्यकर्त्यांच्या ताब्यात असलेले व त्या त्या काळाचा ठसा उरीपोटी जपणारे शैलीपूर्ण वास्तुशिल्प गाविलगड किल्ल्यात अजूनही चांगल्या स्थितीत आहेत, त्या बांधकामाच्या काळातील वर्षाचा उल्लेख करणारे शिलालेख वैशिष्ट्यपूर्ण आहेत, तीन शिलालेख दोन पर्शियन लिपीत तर एक देवनागरीमध्ये आहेत. त्यातून त्या काळातील परिस्थितीचा उल्लेख सापडतो.

गाविलगडास चारी दिशांना उंच व भरभक्कम तटबंदी असून नऊ मोठे प्रवेश द्वार आहेत. जामा मस्जिद, लहान मस्जिद, दरबार हॉल , तोफखाना , सतीचे तुळशीवृंदावन, पंचधातुतील तोफा , तलाव वास्तु आणि वस्तू आहेत. तसेच अतिशय उंच असे पांच बुरुज आहेत. अनेक मोठया वाडयांचे पडके अवशेष , किल्लेदाराची कचेरी, कोठार, गुप्त मार्ग, दगडी भिंती- दरवाजे इत्यादी वैशिष्ट्यपूर्ण वास्तुशिल्प आजही सातशे वर्षापासून वैभवाचे साक्षीदार म्हणून ऊनवारापावसाचा मारा सहन करीत उभे आहेत. काही चांगल्या स्थितीत तर काही पडक्या अवस्थेत आहेत.

त्या काळात वऱ्हाडचा सुभेदार असलेल्या अबुल फजल ह्याने आपल्या 'आईने - ए- अकबरी' या ग्रंथात गाविलगडची स्तुती करणारे वर्णन लिहून ठेवले आहे. गाविलगडचे वैशिष्ट्य असे की, दक्षिणेकडे साम्राज्य विस्ताराची महत्वाकांक्षा ठेवणाऱ्या दिल्ली दरबाऱ्यास गाविलगडची दखल घेतल्याशिवाय त्यांना दक्षिणेकडे पाय ठेवता येत नसे. अश्या प्रकारचे अन्यन्य साधारण महत्व गाविलगडास प्राप्त झाले होते. भोसल्यांचा सरदार बेनीसिंग याचा अतुल पराक्रम आणि त्याच्या पत्नीसह सात जणींनी केलेला जोहारने गाविलगडचा परिसर पूनित झाला आहे.

दहा ते बारा कि.मी. परिघ असलेल्या गाविलगडचे वैशिष्ट्य व भव्यता ठळक नजरेत भरते. गाविलगडचा किल्ला इतका वैशिष्टयपूर्ण आहे की, आजही त्याचे सौंदर्य न्याहाळतांना अख्खा दिवस कसा निघून जातो ते कळत नाही.

गाविलगडच्या तीनही बाजूंना उंच अभेद्य नैसर्गिक कडे असले तरी त्याचा वरचा घेर चिरेबंदी दगडांनी बांधलेला आहेत. गडाची तटबंदी व बुरुज उल्लेखनीय असून आजही बऱ्या स्थितीत आहेत. किल्याचे बांधकाम बेसाल्ट पाषाणातील असून जोडाई चुन्याने केलेली आहे. काही ठिकाणी चुन्याचा वापर न करताही भिंती उभरलेल्या दिसतात.

## किल्यातील दरवाजे -

ह्या किल्यास एकूण ९ दरवाजे आहेत. त्याची नावे अशी- मुख्य दरवाजा (मछली दरवाजा) बुरुजबंद वा वीरभानदरवाजा, शार्दूल दरवाजा, दुसरा दरवाजा, दिल्ली दरवाजा, किचक दरवाजा, खिंड दरवाजा वा मोझरी दरवाजा(खूनी दरवाजा),बस्तापूर दरवाजा, पीरफत्ते दरवाजा, हयापैकी बहुतेक दरवाजांची स्थिती चांगली आहे.

यातही महत्वाचे व उल्लेखनीय तीन दरवाजे आहेत.

१. शार्दुल दरवाजा २.दिल्ली दरवाजा आणि ३. पिरफत्ते दरवाजा.-

## शार्दूल दरवाजा (गंड भेरुन्ड)-

हा दरवाजा चिखलदऱ्या कडून प्रवेश करतांना तिसऱ्या क्रमांकावर येतो. प्रथम दरवाजा हा मुख्य किल्ला दरवाजा (मछली दरवाजा) म्हणून ओळखले जातो ह्या दरवाज्याची द्वारपट्टीका तीन कमानीनी युक्त असून द्वार उत्तरभिमुख आहे. त्यानंतर दुसरा बुरूजबंद दरवाजा लागतो त्यास बीरभान दरवाजा म्हणून सुद्धा ओळखले जाते. ह्यास दोन बाजूंनी दोन बुरुज असल्याने बुरूजबंद हे नाव पडले असावे. हा पूर्वाभिमुख आहे. हया दरवाज्या जवळच गज व शार्दूलाचे शिल्प पडलेले आहे. गज हा ७४x ६५x २५ सेंमी. आकाराचा तर शार्दुल ७०x ७०x २० सेंमीचा आहे.

यानंतर काही अंतरावर दुसरी तटबंदी लागते. हा किल्याचा मध्यभाग होय. मध्यभागातील पहिला दरवाजा म्हणजे शार्दूल किंवा गंडभेरुन्ड दरवाजा. हा अन्य दरवाज्यांच्या तुलनेत बऱ्याच चांगल्या स्थितीत उभा आहे. त्याचप्रमाणे इतरांपेक्षा

अधिक मजबूत वाटतो. दरवाजाच्या दर्शनी भागावर कमानीवर प्राणिशिल्प कोरलेले आढळते. मध्यभागात खजुराचे वृक्ष कोरले आहेत. दोन बाजूला व्याघ्र दाखविले आहेत. दोघेही एकमेकांवर झेप घेण्याच्या पावित्र्यात उभे आहेत. डरकाळीमुळे त्यांचे तोंड उघडे आहेत. ते हत्तीना तुडवित परस्परांवर चाल करुन येत असल्याचे दाखविले आहे. खाली एकूण सहा हत्ती कोरले असून पैकी चार हत्ती झुंजीत गुंतले आहेत. पाचव्या हत्तीने समोरची आघाडी सांभाळली आहे, तर सहाव्यास व्याघ्राने आपल्या लाथेने वर फेकले आहे. दरवाज्याच्या दोनही बाजूस असे सुंदर दृष्य कोरलेले आहे. त्या व्याघ्राच्या वर पंख पसरलेले गरुड आहेत. आश्चर्य असे की, गरुड हे द्विमुखी आहेत. द्विमुखी गरुड दाखविण्या मागे त्यांची शक्ती प्रदर्शीत करण्याचा उद्देश असावा. गरुडाचा देह मानवी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यास 'गंडभैरुन्ड' हया नावाने ओळखले जाते. गंडभैरुन्ड हा काल्पनिक पक्षी असून दक्षिणेतील इतिहास प्रसिद्ध विजयनगर साम्राज्याचे 'राजचिन्ह' आहे.

गाविलगड किल्याच्या प्रवेशद्वारास गंडभैरुन्डाचे चिन्ह कसे आले. या संबंधीचा उल्लेख असा सापडतो की, इमादशाहीचा पहिला स्वतंत्र बादशहा फत्तेउल्ला इमाद याने बहामणी काळात विजयानगरच्या राज्यात चाकरी (कामगिरी) केली होती. त्याने विजयनगरच्या राज्यात इमादशाहीपूर्वी केलेल्या चाकरीची आठवण म्हणून अथवा आपल्या मूळ राजाचा अभिमान म्हणून विजयनगरचे राजचिन्ह दरवाजावर कोरले असावे.

१८ जुलै १९०५ च्या ऑर्केलॉजीच्या सर्वेक्षण अहवालात तत्कालिन सुपरिटेंडेंट कझिंनने दरवाज्यावर कोरलेल्या व्याघ्रांचा , सिंह असा उल्लेख केला आहे. सदर उल्लेख चुकीचा असून कोरीव प्राणीशिल्प हे सिंहाचे नसून वाघाचे आहे. गरुडाच्या संदर्भात कझिंन असा उल्लेख करतात की, द्विमुखा गरुडाचे चिन्ह हे गरुडाच्या समुहास भिंती दाखविण्याकरिता कोरले असावे. ज्याप्रमाणे शेतातील पिक पक्षांनी नष्ट करु नये म्हणून बुजगावणे उभे करतात, त्याप्रमाणे बुजगावणे उभारले असावे. तथापी हे मत सुद्धा पटण्यासारखे नाही. द्विमुखी गरुड पक्षी दाखविण्यामागे शक्तीप्रदर्शनाचाच हेतू असावा. हत्ती हे हिंदूचे तर व्याघ्र हे मुस्लिम राजांचे चिन्ह असून मुस्लीम राजानी हिंदू राजांवर

विजय मिळविला. त्यावेळी वाघांनी म्हणजे मुस्लिमांनी संपूर्ण शक्ती पणास लावून पंजाने व मुखाने हत्तींना म्हणजेच हिंदूना ठार मारले. स्वतंत्र राज्य प्राप्त झाल्यानंतर म्हणजे फत्तेउल्लाच्या काळात राज्यात शांती लाभावी या करिता शांतीचे प्रतीक म्हणून खजुराचे वृक्ष कोरले आहेत. त्याचप्रमाणे राज्यात सुरक्षितता, सुबत्ता रहावी ह्या करीता पंख पसरविलेला पक्षीराज गरुड कोरलेला आहे. ह्याच दरवाज्यास काही लोक दिल्ली दरवाजा म्हणतात. तथापि ते चुकीचे असून त्या दरवाज्यास खरे नांव 'शार्दूल दरवाजा' (गंडभैरुन्ड) असे आहे.

## दिल्ली दरवाजा –

दिल्ली दरवाजा हा किल्ल्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचा दरवाजा होय. म्हणून याची बांधणी सुद्धा विशिष्ट पद्धतीने केली आहे. त्यास अधिक सुशोभित करण्याचा प्रयत्न केला आहे. या दरवाजावर पूर्व व पश्चिमेस हत्ती व सिंहाचे शिल्प कोरले आहे. दरवाज्यात (कोतवाली कचेरी) चौकीची व्यवस्था केली आहे. बाहेरुन प्रवेश करणाऱ्या व्यक्तीची येथे प्रथम तपासणी होत असे. त्यानंतर आत जाण्यास अनुमती दिली आज असे. दरवाजाच्या आंतील भागाचा उपयोगही चावडी म्हणून केला जात असावा. चावडीची बांधणीही सुंदर व मनमोहक अशीच आहे. याच दरवाज्यात इंग्रजांशी लढता लढता बेनीसिंग हयाने आपले प्राण सोडले होते. यावेळी चवदा रजपूत स्त्रियांनी जोहार केला होता. तिथे असलेल्या त्यांच्या समाधी भूतकाळाची आठवण करुन देतात. दिल्ली दरवाजा आणि दर्या तलाव हे भारतीय स्त्रिची महिमा, गरिमा दर्शविणारे बोलके स्मारक म्हणून उभे आजही आहेत.

## पीरफत्ते दरवाजा –

हा दरवाजा किल्याच्या दक्षिणेकडील भागात उभारलेलाआहे. किल्याचा शेवटचा दरवाजा म्हणजे पीरफत्ते दरवाजा. हा अत्यंत मजबूत असा बांधलेला आहे. तथापि हया दरवाजाचे खरे नाव 'पीरपाथरी द्वार' असे होते. या दरवाजावर शिलालेख कोरला आहे. अलिकडे तो बराच जीर्ण झाला आहे. अक्षरे अस्पष्ट व वाचता न

येण्यासारखी आहेत. दक्षिण पश्चिमेकडून येणाऱ्या मोसमी वाऱ्याच्या झोतामुळे शिलालेखाची अधिकच झीज झाली आहे. तो चारशे वर्षाहून अधिक काळापासून तेथे आहे. त्या शिलालेखावरुन फत्तेउल्ला इमाद उलमुल्क याने देव तलावाच्या काठावरील लहान जामा मस्जिदीचे १४८८ मध्ये नूतनीकरण केले जुने दगड पुन्हा व्यवस्थित बसविले असा उल्लेख सापडतो. त्याप्रमाणेच मोहम्मदशहा बहमणीने मोठया मस्जिदीची दुरुस्ती केल्याचा उल्लेख सुद्धा आहे. मुख्यत: या मस्जिदीच्या पश्चिमेकडील भिंतीची दुरुस्ती केली असावी. टेकडीच्या उतारावरील पायऱ्या सुध्दा फत्तेउल्ला हयाच्याच काळात बांधण्यात आल्या. मस्जिदीच्या समोर फत्तेउल्लाची कबर आहे.

दरवाज्याच्या कमानीपटावर भौमितीक नक्षी कोरून त्यास बरेच अंलकृत केले आहे. याशिवाय मोत्याचा हार चोचीत धरलेले हंस, कमळपुष्प, दरवाज्याच्या दोन्ही कमानी पटावर कोरले आहे. ह्या अलंकरणाकरून हा दरवाजा विशेष महत्वाने उभारले असून अन्य दरवाज्याच्या तुलनेत एक वेगळ्या स्थापत्य कलेचा उन्मेष आढळून येतो. या दरवाज्या शिवाय किचकदरीच्या बाजून 'किचक दरवाजा' व पश्चिमेस मोझरा आदी गावाकडे जाण्यास काढलेला 'खिंडदरवाजा' आहे. याच खिंडदरवाज्यातुन इंग्रजांना आपली मोहीम यशस्वी करण्यात मदत झाली होती.

## किल्यातील इमारती –

सुमारे दहा ते बारा कि.मी. परिसरात पसरलेल्या गाविलगड किल्याच्या भव्य तटबंदीयुक्त वास्तुचे स्वरूप आणि तेथील अन्य इमारती उभारण्यासाठी हिंदू व इस्लाम कारागिरांनी विविध कालखंडात घेतलेले परिश्रम उल्लेखनीय आहेत. हिंदू व यवनी शिल्पकलेचा व वास्तुकलेचा एक मनोरम आलेख गाविलगडच्या परिसरात सर्वत्र दिसून येतो. गाविलगडावर आज शिल्लक असलेल्या इमारती व अवशेषांचा विचार केल्यास गाविलगडचे बुलंद बुरुज व प्रचंड दरवाजे या शिवाय मंदिरे, कोठारे, जामा मशीद, हत्तीखाना, राजाची समाधी, लहान मस्जिद, बारुदखाना, नगारखाना, तेलखाना, जनानखाना, स्नानगृह, अन्य लहान मोठया वास्तू आजही सुस्थितीत आहेत. परंतु त्या आज काळाशी झुंज देतांना दिसतात. काहींचे भग्नावशेष बघावयास मिळतात. काही

काळाच्या ओघात नष्ट झालेले दिसतात. संपूर्ण महाराष्ट्रात एवढे मोठे इतिहासकालीन अवशेष आज क्वचितच एखाद्या किल्यावर बघावयास मिळतात. हे या गडकिल्याचे महत्वाचे वैशिष्ट्य होय.

## लहान मस्जिद –

दिल्ली दरवाजानंतर काही अंतरावर दक्षिणेकडे सुंदर आणि मनोहारी देवतलावाचे दर्शन होते. हया तलावाच्या किनाऱ्यावर छोटी मस्जिद म्हणून नक्षीकामाने अलंकृत सुंदर मस्जिदचे दर्शन हाते. मस्जिद, चार स्तंभ आणि आठ अर्ध स्तंभावर उभी आहे. स्तंभावर व छतावर कोरलेले नक्षीकाम मनाला मोहवून टाकते. ही इमारत पूर्वाभिमूख असून तिला एकूण सहा त्रिकोणी कमाणी आहेत. यातील भिंतीवर एक शिलालेख कोरला आहे. सदर शिलेखाच्या वाचनावरुन असे लक्षात येते की, ही मस्जिद बहिरामखानच्या मुलांनी बांधली. मस्जिदीचे एकूण बांधकाम व सौंदर्य याचा विचार करता ती केवळ राजघराण्यातील व्यक्तींना नमाज अदा करण्यासाठी असावी असे सकृतदर्शनी जाणवते.

## धान्यकोठार –

लहान मस्जिदीच्य दक्षिणेस काही अंतरावर अगदी चांगल्या स्थितीत असलेली धान्य कोठाराची इमारत दिसते. ही वास्तू एकूण वीस स्तंभावर उभारलेली आहे. कोठराच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने बांधकाम करीत असतांना काटेकोरपणे लक्ष दिल्याचे दिसते. धान्य सुरक्षित रहावे या करिता जमिनीपासून ३ फूट उंच स्तंभांना जोडून मचान तयार केली आहेत. धान्यास पाण्याचा ओलावा लागू नये म्हणून, तसेच किटकांपासून सुरक्षित रहावे म्हणून मचान उभारले असावे.

## समाधी (छत्री)–

ही समाधी देव तलावाच्या किनाऱ्यावर आहे. छत्रीचे बांधकाम चौरस विधानातील असून त्यास स्तंभ नाही. छत्रीचा वरचा भाग घुमटाकृती आहे. ही समाधी

कुणाची असावी ह्याबद्दल बोध होत नाही. राजघराण्यातील कुण्यातरी मोठया व्यक्तींची असावी, एवढाच अंदाज बांधता येतो.

## मंदिर –

देव तलावाच्या दक्षिण किनाऱ्यावर हे मंदिर आहे. मंदिरातील गर्भ- गृहात हल्ली मूर्ती नसल्यामुळे हे मंदिर कुठल्या देवतेचे होते हे निश्चित सांगता येत नाही. मंदिराच्या स्थापत्य रचनेवरुन ते भोसले कालीन आहे, हे निश्चितपने सांगता येते . मंदिराचे बांधकाम गर्भगृह व मंडप या दोन भागात असून ते संधार पद्धतीत बांधले आहे. मंदिराच्या मंडपास स्तंभ नसून ते भिंतीतच उभारले आहे. मंडपास चारही बाजूंनी दरवाजे आहेत. मंडप आयाताकृती असून त्याच्या भिंतीवर भौमितिक नक्षी, पानेफुले आदींची कलाकूसर आहे. शिखर घुमटाकृती आहे. मंदिराचे संपूर्ण बांधकाम विटात केले असून मंदिराच्या सभोताली असलेल्या भिंतीचे बांधकाम पाषाणात केले आहे.

## जामा मस्जिद –

किल्ल्यातील वास्तुपैकी आकाराने भव्यदिव्य आणि स्थापत्यदृष्ट्या अत्यंत महत्वाची वास्तू म्हणजे जामा मस्जिद. दक्षिणेकडील सर्वांत उंच पर्वत रांगेतील उंचवटयावर ही मस्जिद मोठया डौलात ऊन, वारा, पावसाची तमा न बाळगता उभी आहे. किल्याच्या पहिल्या प्रवेशद्वारावरुनच उंचवटयावर असलेल्या मस्जिदीचे सहज दर्शन होते. पहिला दरवाजा ते मस्जिद हे अंतर ५-६ कि.मी.चे आहे. मस्जिदीच्या दर्शनी भागात सात कमानी आहेत. अशा कमानींचे एकूण तीन दालन आहेत. सर्व कमानीच्या वरील भागावर साध्या नक्षीत कंगणी कोरल्या आहेत. पैकी तीनचार तुटक्या अवस्थेत आहेत. दर्शनी भागातील फसाडाच्या शेवटच्या भागावर कंगोरे अंकित आहेत. दोन कमानीमधील खांब हे चौकोणी आकाराचे आहेत. प्रत्येक दालनाच्या छतावर प्रत्येकी सात असे एकूण एकवीस घुमट होते. सद्या फक्त चौदा घुमट शिल्लक आहेत. पाठीमागील दालन बऱ्याच कासळलेले आहे. शिखरावर चारही बाजूने उंच मिनार उभारुन सुशोभित केले होते. परंतु आज फक्त उत्तरदक्षिणेकडील एक मिनार शिल्लक

आहे. या मिनाराचे बांधकाम नक्षियुक्त आहे. चारही बाजूने बारिक जाळीचे नक्षीकाम केलेले आहे. मस्जिदी समोर पंटागण आहे. ते फरसबंदी केली आहे. १४८८ मध्ये फत्तेउल्लांने मस्जिदिच्या दुरुस्तीचे काम बऱ्याच प्रमाणात केले होते या संबंधीचा उल्लेख शिलालेखात सापडतो.

मस्जिदीच्या मिनारचा काही भाग किंवा छत्रीचा आकार चौरस करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचे कंगोरे खोल व बॅकेटस् उच्च कलाकृतीचा नमुना आहे. छिद्रयुक्त जाळी, रूपेरी काम उल्लेखनीय आहे. मस्जिदीस परकोट असून त्यास पूर्वेकडे दरवाजा आहे. उत्तर-दक्षिणेस लहान प्रवेशद्वारे आहेत. पूर्वेकडील प्रवेशद्वारापासून मस्जिदीत जाण्याकरिता पायऱ्या आहेत. त्या चढून आल्यानंतर भव्य पटांगणात प्रवेश करता येतो. त्याचप्रमाणे याच जिण्याच्या पायऱ्या उलट दिशेने पूर्वेस खालपर्यंत केल्या आहेत. मस्जिद बांधल्यानंतर काही काळाने येथे थडगे बांधले आहे. थडग्याच्या इमारतीमुळे हे प्रवेशद्वार बंद झाले किंवा करण्यात आले असावे. हे थडगे फत्तेउल्ला इमादउल्मुल्कचे आहे.

## राणीमहल-

असे म्हटले जाते की, पावसाळ्यात राहण्याकरिता इमली बाग या नावाने ओळखल्या जाणाऱ्या भागात महाल बांधले होते. यावर कोरलेली कलाकुसर मनोहारी व चित्ताकर्षक आहे. कोरीव काम बरेच बारिक आहे. ह्या महालाजवळ एक मोठी विहिर आहे. विहिरीचा उपयोग पिण्याच्या पाण्याकरिता होत असे. हे महाल आता पडक्या स्थितीत आहे.

## राणी झरोखा-

हा झरोखा फत्ते दरवाज्याजवळ आहे. हा आजही चांगल्या स्थितीत आहे. फक्त पश्चिमेकडील भिंत तुटली आहे. तसेच वर जाण्याकरिता त्यावर केलेल्या पायऱ्या तुटलेल्या आहेत. या झोराख्यातून अचलपूर, अमरावती, अकोला, आकोट, अंजनगावचे दर्शन होते.

वरील इमारतींशिवाय अन्य काही इमारतींचे बांधील अवशेष बघावयास मिळतात. त्यात किल्लेदारांचा वाडा, दारूगोळ्याचे कोठार आणि अन्य निवास स्थाने भग्न स्थितीत बघावयास मिळतात.

**बुरूज–**

किल्याच्या अत्यंत महत्वाचा भाग म्हणजे शत्रुच्या कारवायांची टेहाळणी करण्यासाठी बांधलेले बुरूज. संरक्षणाच्या दृष्टीने याला अनन्यसाधारण महत्व असे. प्रस्तुत किल्यास पांच बुलंद बुरूज आहेत. (१) चांदणी बुरूज (२)मोझरी बुरूज (३) तेलिया बुरूज (४) सोन किल्ला बुरूज आणि (५) बहराम बुरूज.

**मोझरी बुरूज–**

हा कलात्मकदृष्ट्या महत्वाचा बुरूज होय. त्याचे बांधकाम सुद्धा वैशिष्ट्यपूर्ण आहे. बुरूज म्हणजे भारतीय स्थापत्य कलेचा उत्कृष्ट नमुना होय. हा बुरूज मोझरी कडील तटबंदीला दरीच्या बाजूने लागून असलेल्या एका उंच भागावर एकास एक असे तीन मजले उभारून बांधला आहे. या बुरूजावर उभे होऊन दरीकडे दृष्टीक्षेप टाकल्यास चक्कर येण्याची शक्यता नाकारता येत नाही. कारण बुरूजावरून दरी बरीच खोल दिसते.

**बहराम बुरूज–**

वरील सर्व बुरूजात प्रसिद्ध म्हणून बहराम बुरूजाची गणना होते. या बुरूजाची बांधणी चुना व पाषाणात केली आहे. बांधणी अगदी मजबूत आहे. सरंक्षणाचा दृष्टिकोन लक्षात घेऊन भरभक्कमपणे बुरूजाची बांधणी केली आहे. तोफगोळ्यांचा मारा करणे, बंदुकीचा मारा करणे यासाठी विविध प्रकारच्या छिद्रांची निर्मिती केली आहे. हा बुरूज किल्याच्या दक्षिण-पश्चिम तटबंदीवर आहे. बुरूजाचे फारशी नाव 'बुर्ज-ए-बहराम' असे आहे. बहराम हा अहमदनगरचा नवाब सय्यद मूर्तजा निजामशहा सब्जावरी ह्याचा एक अधिकारी होता. बहरामखानच्या देखरेखीखाली या किल्याची

बरीच दुरूस्ती करण्यात आली. तसेच इतर घटनांचा उल्लेख करण्याच्या दृष्टीने या बुरूजावर शिलालेख कोरण्यात आला. त्याचा अर्थ असा- 'बहरामने हा बुरूज बांधला ज्याच्याकडे कलेच्या दृष्टीने बघता असा सुंदर आणि कलेचा अजोड नमुना गाविलगडात दुसरा बुरूज दिसत नाही.'

''ह्याने हा बुरूज इतका उंच बांधला की, खुद्द शनीग्रहाने सुद्धा त्याच्या आंचलमध्ये शरणागती घेतली आहे की काय, असा भास होतो.''

ही रचना थोडी अतिशयोक्तीपूर्ण वाटत असली तरी त्यात बराच सत्यांश आहे बुरूजाच्या जवळ जाताच असे वाटते की, हा बुरूज आकाशासी स्पर्धा करीत आहे. इतकी त्याची उंची आहे. या शिलालेखात हा बुरूज बहराम यांने हिजरी सन ९८५ (इ.स. १५७७) मध्ये बांधल्याचा उल्लेख आढळतो. वरील वर्णन ऐकूणनच मोगल सम्राट अकबराची नजर किल्ल्यावर पडली होती. त्याने १५९८ मध्ये अबुल फजल यास पाठवून किल्ला ताब्यात घेतला. गाविलगडचे शासन, वैभव संपन्न होते असा उल्लेख 'आईने-ए-अकबरीत' सापडतो.

## तलाव-

गाविलगडच्या किल्ल्यात एकूण दहा तलाव आहेत. शक्कर तलाव, धोबी तलाव, मछली तलाव, दरियाकुंड, देवतलाव, लेंडीतलाव, सतीतलाव, बामजी तलाव, खमतलाव आणि शनीतलाव यापैकी शक्कर तलाव, देवतलाव आणि धोबीतलाव यामध्ये बाराही महीने पाणी असते.

## राणीचे स्नानगृह-

स्नानगृहामध्ये चौकोनी टाके आहे. मध्यभागात मोठा फवारा आणि चार बाजूस, लहान फवारे आहेत. चारही बाजुला विश्रांती. आणि वेशभूषेसाठी मोठे दालन बांधले आहे. हे स्नानगृह फक्त राजघराण्यातील स्त्रियांकरिता उपयोगात आणले जात असावे. त्याच्या चारही बाजूस सुमारे २० फुट उंचीच्या भिंती आहेत. स्नानगृहापासून राणीमहालापर्यंत जाण्यास भुयारी मार्ग असल्याचे सांगतात.

## गडावरील तोफ –

बहमणी कालापासून गाविलगडची ख्याती त्यावरील अचूक माऱ्याच्या तोफांसाठी होती. येथे दहाच्यावर तोफा आहेत. त्या एकाच प्रकारे बनविलेल्या दिसतात. अनेक धातुचे मिश्रण करून, त्या मिश्रणाच्या लांब लांब पट्टया करून, त्यास गोल गोल आकार देऊन तोफा घडविल्या आहेत. आजही तेथे सुस्थितीत असलेल्या 'कालभैरव' व 'बिजली' नावाने ओळखल्या जाणाऱ्या दोन महत्त्वाच्या तोफा आहेत. ह्या त्याच्या कड्यांसह चांगल्या स्थितीत आहेत. पैकी एक २२ फूट लांब तर दूसरी १६ फूट लांब आहे. एक पीर फत्ते दरवाज्यावर असून दुसरी चिखलदऱ्याकडे आहे. ह्या तोफांना पीरफत्तेची तोफ व नगारखान्याची तोफ असे म्हणतात. याशिवाय लोहारी तोफ, लक्ष्मी तोफ व अष्टधातूची तोफ आहे. एक मोठी तोफ बस्तापूर दरवाज्यावर आहे. काही छोट्या तोफा खाली उतरविण्यात आल्या काही पोलिसांच्या ताब्यात होत्या. काही अष्टधातूंच्या तोफा चोरांनी लांबविल्या असे बोलल्या जाते.

'आईने-ए-अकबरी' ग्रंथात अबुल फजलने केलेल्या वर्णनावरून गाविलगडावर तोफा ढाळण्याचा आणि पोलादाची शस्त्रे बनविण्याचा उद्योग उत्कृष्ट चालत होता असा उल्लेख मिळतो.

## अष्टधातूंची तोफ–

ही तोफ सोने, चांदी, पितळ, कास्य, जस्त, शिसे, आणि लोह ह्या आठ धातूच्या मिश्रणातून घडविलेली आहे. मूल्यवान धातू असल्यामुळे लोक ह्या तोफेस कापून दागिने बनविण्याकरिता घेऊन जात होते. म्हणून ही तोफा वनविभागाच्या कार्यालयात आणून सुरक्षितपणे ठेवली आहे. ह्या तोफेचा आता फक्त तीन फूट लांबीचा तुकडा वाचलेला आहे. त्याचे वजन सुमारे तीन ते चार क्विंटल असावे. अष्टधातुंच्या अंगठ्या सुंदर बनतात आणि त्या सोन्यासारख्याच दिसतात असे म्हटल्या जाते.



# ६. गाविलगडात कुराणाची प्रत

एलिचपूरच्या नबाबाच्या ग्रंथालयात एक सुंदर आणि मौल्यवान कुराणाची प्रत होती. ह्या ग्रंथाच्या प्रत्येक पानाभोवती सोन्याची नक्काशी केली होती. त्यातील अक्षरे हिरे, पाचू,मोती, वगैरे मौल्यवान खडे बसवून व रंग खुलवून काढली होती. ही कुराणाची प्रत मूळची दिल्लीच्या बादशहाची त्याने तयार करुन आपल्या ग्रंथालयात ठेवली होती. परंतु मराठयांनी ज्यावेळेस दिल्ली सर केली त्यावेळी भोसल्यांच्या लोकांनी ती लुटीत मिळविली होती. आणि गाविलगड किल्ल्यांत भोसल्यांचा जो बहुमूल्य खजिना ठेवला जात असे तिथे हया कुराणाची प्रत सन्मानपूर्वक ठेवण्यात आली होती. इंग्रज अधिकारी वेलस्लीने इ.स. १८०३ मध्ये गाविलगड घेतला आणि भोसल्यांचा खजीना लुटला त्यावेळेस एलिचपूरचा नबाब त्याचे सोबत होताच; नबाबाने गाविलगडातील लुटीची सर्व संपत्ती एलिचपूरास आणली. त्यात ही बहुमूल्य कुराणाची प्रत एलिचपूरच्या सलाबतखानबाबाकडे आली. आणि तेंव्हा पासून ती प्रत नबाबाच्या किताबखान्यात होती परंतू नंतर ही कुराणाची प्रत हैद्राबादचा दिवाण शम- सुल-उमरा यांने मागणी केल्याप्रमाणे त्याच्याकडे पाठविण्यात आली. दिवाण तर फार आनंदित झाला परंतु त्यामुळे एलिचपूरच्या नबाबास जनतेचा रोष पत्कारावा लागला असा इतिहास आहे.



# ७. शिलालेख

१. **पीर फत्ते दरवाज्यावरील लेख**

भाषा - परशीयन

लिपी - परशीयन

کنم ز(؟) • • • • •

الغ عماد الملک • • بعهد دولت بیغا (؟) محمود شاه آنک (آنکه)

چون فردوس • • • بقلعهٔ گاویل ز سنگ کهن •

که زیر اوست چو ویلی (؟) کرر (؟) قرآن • • مسجد جامع نباشد بر سر حوض

که اوست پاک چو بیت المقدس و معمور و قدرش بدید بفزد خرد گفت بیا ببیت سرور

भाषांतर - ...................कुनम (?)

अल्ग अमादुलमुल्क...........ब अहदे दौलते बैगा (?)

महेमुदशाह ऑके............चूँ फिरदौस..............

बकिल-ए गाविल ज संगे कोहन - के जेरे अूस्त

चूँ वेली (?) करर (?) कुरआन- मसजिंदे जामा

नबाशद बर सरे हौज के अूस्त पाक चूँ बैतूल

मुकद्दस व मामूर व कुदरतश ब दीद व निज्दे खुद

सुफ्त बिया बैते सुरूर।

२. **बहराम बुरूजावरील लेख**

**भाषा - परशीयन**

**लिपी - परशीयन**

بکاویل ساخته بهرام برحي * که مثل آن ندیده چشم ایام

رسانده رفعت آنرا بجاي * که کیوان در پناهش کرد آرام

چو کردم فکر تاریخش برآمد * به تاریخش تمام آن برج بهرام

भाषांतर- हा लेख काव्यात्मक (शाहिरीत) लिहला आहे

वकाबिल साख्ता बहराम बरही

के मिस्ले ऑन दीदा चश्मे अय्याम

रसान्या रफअत ऑश बजाय

के किरान दर पनाहस कर्द आराम

चू करदम फिकरे तारीर वश बर आमद

ब तारीरवश तमाम ऑ बुर्ज बहराम




चिखलदरा शहराचा नकाशा
उत्तर
पश्चिम
पूर्व
दक्षिण
सेमाडोह कडे
पंचबोल पॉईंट
वीर तलाव
प्रॉस्पेक्ट पॉईंट
ठाकूर पॉईंट
वराट कडे
संग्रहालय
मंकी पॉईंट
गोराघाट पॉईंट
हरीकेन पॉईंट
शासकीय उद्यान
शिवसागर पॉईंट
मोझरी पॉईंट
मार्केट
बसस्थानक
जलक्रीडा
देवी पॉईंट
परतवाडा कडे
भीमकुंड
मालवीय पाईंटकडे
गाविलगड कडे

# ८. चिखलदरा अणि परिसर

**चिखलदरा-**

चिखलदरा हे विदर्भातील एकमेव थंड हवेचे ठिकाण आहे. हे ठिकाण ब्रिटीशांच्या राजवटीमध्ये उदयास आले. १८०३ मध्ये इंग्रजांनी गाविलगड किल्ला जिंकल्यावर तेथिल लोक, किल्ल्याच्या बाहेरील पहाडावर येऊन राहू लागले. हीच चिखलदऱ्याची पहिली वस्ती होय. यापूर्वीच उल्लेखिल्याप्रमाणे हैद्राबाद पलटणीचा इंग्रज कॅप्टन रॉबीन्सन याने १८२३ मध्ये या वस्तीचा शोध लावला. त्याला हे 'थंड हवेचे ठिकाण' म्हणून आवडले. इंग्रजांनी हे स्थळ विकसित केले. त्यांच्याबरोबर ख्रिश्चन मिशनरींचा प्रवेश झाला. त्यांच्या संस्था आजही येथे कार्यरत आहेत. १८५०च्या सुमारास ब्रिटीशांनी येथला कारभार पाहण्यासाठी प्लॅटो फंड कमीटीची स्थापना केली. मध्यप्रांत व बेरार राज्य असतांना १.८.१९४८ रोजी चिखलदरा येथे गिरीस्थान नगरपरिषदेची स्थापना करण्यात आली.

चिखलदरा शहराला 'विदर्भाचे नंदनवन' म्हणून ओळखतात. सातपुड्याच्या शिखरावर चिखलदऱ्याचे पठार असून मोथा ते वैराट पर्यंतच्या २५ कि.मी. मध्ये ते पसरलेले आहे. त्याची रुंदी १ ते ५ कि.मी. च्या दरम्यान आहे. चिखलदरा शहराचे क्षेत्रफळ ३९४ हेक्टर एवढे आहे. चिखलदरा शहर दोन पातळ्यांमध्ये विभागले असून लोअर प्लॅटोची समुद्रसपाटीपासूनची उंची ३६०० फूट तर अप्पर प्लॅटोची ३६५० फूट आहे. चिखलदऱ्यातील हवामान थंड आणि आरोग्यदायी असते. येथे आतापर्यंत नोंदविल्या गेलेली जास्तीत जास्त तापमान १०३ फॅ. असून कमीत कमी तापमान ४०.६ फॅ. नोंदविल्या गेली आहे. येथील पावसाचे वार्षिक सरासरी प्रमाण १८० ते १९० सें.मी. आहेत.

चिखलदरा शहराचा लोकसंख्या ३६०० असून यापैकी निम्मे लोक शासकीय व इतर संस्थांचे कर्मचारी आहेत. शहरात बहुतेक सर्व धर्माचे लोक राहतात.

## या परिसरातील पाहण्योग्य स्थळांची माहिती.

### भीमकुंड –

परतवाड्यापासून मोथा मार्गे चिखलदऱ्यास येतांना आलाडोह गावाच्या अलिकडे दक्षिणेस एक रस्ता भीमकुंडाकडे जातो. हे अतिशय दर्शनिय स्थळ आहे. पावसाळ्यात उंच कड्यावरून खोल दरीत प्रपात पाहतांना अंगावर रोमांच उभे राहतात. खालच्या दरीत एक कुंड दिसते याच कुंडाला भीमकुंड म्हणून ओळखतात.

चिखलदऱ्यातील पौराणीक प्रसिध्द स्थळ म्हणजे 'भीमकुंड' हे स्थळ. चिखलदरा गावाच्या पूर्वेस ३ कि.मी. अंतरावर आहे. येथे पोहचण्याकरिता डांबरी रस्ता आहे. भीमकुंड खाईत प्राणहानी होऊ नये ह्या उद्देशांनी खाईच्या काठावर लोखंडी कठडा लावला आहे. येथे उभे राहून दक्षिणेकडे नरज फिरविली असता गाविलगड किल्याच्या पूर्वेकडील तटबंदीचे दर्शन होते. उत्तर-दक्षिण असलेल्या ओढ्याच्या मध्यभागात एक खोल असा खड्डा आहे. त्यास 'भीमकुंड' म्हणून ओळखले जाते. त्याची खोली सुमारे ३,५०० फुट आहे. हया कुंडास भीमकुंड कां म्हटले जाते हया संबंधीचे विवेचन ह्यापूर्वी केले आहेच. भीमाने किचकाचा वध करुन त्याने ह्या कुंडात आपले रक्ताने माखलेले अंग धुतले म्हणून येथील पाणी लाल दिसते, त्यास भीमकुंड म्हटले जाते अशी आख्यायिका आहे. परंतु नैसर्गिक साधनाच्या पुराव्यावरून विचार करता, असे लक्षात येते की, येथील जमीन ही लाल मुरुम-मातीची असल्यामुळे येथून वाहणारे पाणी हे (लाल माती मिसळल्यामुळे)लाल दिसते.

भीमकुंडापासून दक्षिणेस काही अंतरावर किचकदरा आहे. ह्या दरीची जवळची खोली सुमारे १५५ फुट असून मध्यभागातील खोली सुमारे १,५०० फूट आहे. येथे मधमाश्याची पोळे बघावयास मिळतील. तेव्हा त्यापासून प्रवाश्यांनी सावध असावे. चुकूनही त्यांना त्रास होईल असे कृत्य केल्यास आपली थोडीसी चुक आपले प्राण संकटात पाडू शकते.

### वैराटची देवी आणि सूर्यास्त स्थळ–

चिखलदरा पासून सुमारे १० कि.मी. अंतरावर वैराट गाव आहे. या गावाला

जाण्यासाठी डांबरी रस्ता आहे. वाटेत चोरणी आणि पसतलई ही वनग्रामे लागतात. हा संपूर्ण रस्ता देखाव्यांनी ओतप्रोत भरलेला आहे. वाटेत ठिकठिकाणी उतरून ही देखावे पाहता येतात. विशेषतः पसतलई गावपासून अर्धा किलोमीटर अंतरावर एका छोट्या पुलापासून खालचा दिसणारा विस्तीर्ण प्रदेश पाहण्या जोगा आहे. तसेच वैराट गावाच्या अलिकडे असलेला नैसर्गिक पूल सुद्धा पाहण्यासारखा आहे. या पूलाच्या दोन्ही बाजूंना खोलच खोल दऱ्या आहेत. पावसाळ्यात या दऱ्यात अडकलेले ढग आणि हिरवीगार वनश्री पाहून डोळ्याचे पारणे फिटते. पर्यटक सामान्यतः सूर्यास्ताचे नयनमनोहर दृष्य बघण्याकरिता जातात. वैराट गावापासून जवळ असलेल्या टेकडीची उंची समुद्र सपाटीपासून ३,८६६ फुट असून हे स्थळ रमणीय आहे. नैसर्गिक सौदर्याची अगदी लयलूट येथे बघावयास मिळते. या परिसरात महाभारतातील विराट राज्याची राजधाणी होती, असा स्थानिक लोकाचा समज आहे. येथील पर्वत रांगेच्या उंच शिखरावर अलीकडेच स्थानिक लोकांनी छोटेसे देवीचे मंदिर बांधले आहे. ही देवी स्थानिक गवळी लोकांची कुलदेवता आहे. नवरात्र आणि चैत्रास येथे भाविकांची बरीच वर्दळ असते. येथील प्राचीन देवीचे स्थान अत्यंत अवघड अश्या वाटेवर असून देवीचे दर्शन करणे म्हणजे एक प्रकाराची कसोटीच आहे. प्राचीन देवीचे मूळ ठिकाण वैराट टेकडीच्या पश्चिम भागात असून येथे पोहचण्याची वाट प्राणघातक अशी आहे. येथील टेकडीमधील दरी दोराचा आसरा घेऊन पार करावी लागते. अश्या प्राणघातक आणि बिकट वाटेने मार्गक्रमणा केल्यानंतर प्राचीन देवी स्थापित असलेल्या भुयाराचे मुखदर्शन होते. १०० ते १५० फूट भुयारातून मार्गक्रमणा केल्यानंतर मूळ वैराट देवीचे दर्शन होते. ह्याच भुयाराच्या वरच्या भागावर हल्लीचे नवीन मंदिर बांधले आहे. असे म्हटले जाते की, भुयारात असलेल्या देवीकडे जाणारी वाट अवघड आणि प्राणघातक असल्यामुळे देवीचे दर्शन घेणे अवघड होते. आणि म्हणून देवीचे दर्शन घेणे सोपे व्हावे हया उद्देशानी नविन मंदिर उभारुन जुन्या देवीची प्रतिमूर्ती स्थापित करण्यात आली. त्यामुळे भाविकांना देवीचे दर्शन घेणे सोईचे झाले. एवढेच नव्हे तर स्त्रियांना सुद्धा पूजेची व दर्शनाची संधी प्राप्त झाली. येथे नेहमीच जंगली प्राण्यांची भिती असते. वाघ,चित्ता, अस्वल इत्यादि हिंसक प्राण्याचा येथे संचार असतो. आणि म्हणून येथे

प्रवास करतांना समुहानेच प्रवास करणे सोईचे आहे. एकट्याने प्रवास करणे टाळावे.

या टेकडीवरून दिसणारा सूर्यास्त अतिशय मनोहारी असतो. कारण टेकडीच्या खाली दूरपर्यंत विस्तीर्ण प्रदेश दृष्टीस पडतो व क्षितीजावर अस्त पावणाऱ्या सूर्याची प्रत्येक स्थिती स्पष्टपणे दिसते. याच टेकडीवरून पूर्वेकडे पाहिल्यास चिखलदरा गावाचे विलोभनिय दृष्य दिसते. व आपण चिखलदऱ्यापेक्षाही उंच स्थानावर आहोत हे सहज कळते. टेकडीवरून दक्षिणेस पाहिल्यास शहानूर तलावाचा जलाशयही दिसतो.

## वीर तलाव–

हा तलाव ब्रिटीश सरकारच्या कारकीर्दीत बांधून पूर्ण केला आहे असे येथील लोह लेखावरून कळते. या तलावाच्या बांधकामास इ.स. १८८९ च्या मे महिन्यात सुरूवात करून डिसेंबर १८९० मध्ये बांधकाम पूर्ण करण्यात आले. हा तलाव इंजीनिअर आर. डब्ल्यु. स्विनेरसन आणि एम.डी. हुसेन खान ओव्हरसीयर यांच्या देखरेखी खाली बांधून पूर्ण करण्यात आला. या तलावाची बांधनी बेसाल्ट पाषाणात अत्यंत मजबूतपणे केली आहे. आजही तलावाच्या भिंतीवरून ये-जा सुरळीतपने करता येते. या तलावाचा उपयोग प्रामुख्याने सैनिका करिता केला जात असल्यामुळे त्यास 'वीर तलाव' म्हणून संबोधिल्या गेले. हल्ली ह्या तलावाच्या पश्चिमेकडील किनाऱ्यावर वनविभागाद्वारा रोपवाटीका तयार केली असून येथे कलमा व बियाणे तयार केली जातात. ब्रिटीश काळातील बांधकाम बघण्याकरीता तलावास आवर्जून भेट द्यावयास हरकत नाही. या तलावाच्या उत्तरेस 'मरीयनपूर' नावाचे मिशनरीने बसविलेले गांव आहे येथे त्याचे सुंदर चर्च आहे. धर्मांतर केलेले कोरकू , गोंड व इतर लोक येथे स्वच्छदाने काम करतांना दिसतात.

## पंचबोल पॉंईट–

चिखलदऱ्यात आर्वजून बघण्यासारखे स्थळ म्हणज पंचबोल पॉंईट हे होय. येथे आपणास निसर्गाचा चमत्कार बघावयास व ऐकावयास मिळतो. वीरतलावाच्या समोरून उत्तरेच्या बाजूने 'पंचबोल' या दरीकडे पक्की सडक जाते. या रस्त्यावर



गडावरील तोफ



विहंगम दृष्य व तटबंदी

सुरवातीला कॉफीचे मळे बघावयास मिळतात. वीर तलावापासून सुमारे ४ कि.मी. अंतरावर हे पंचबोल स्थळ आहे. डोळे गरगरतील इतकीखोल व विस्तीर्ण अशी ही दरी आहे. येथे पांच डोगर कड्यांचा मिलाप झाला असून सर्व दऱ्या मिळून एक मोठा दरा निर्माण झाला आहे. पाँईट वरून आवाज केल्यास येथे पाच प्रतिध्वनी सुस्पष्ट एवृ येतात. म्हणूनच या ठिकाणाला 'पंचबोल' (फाईव्ह इको पाँईट) पाँईट असे संबोधीले जाते. मोठ्याने ओरडल्याने तिकडून (उलट) तसलीच आरोळी प्रतिध्वनीत होते. चार आवाज तर फार स्पष्ट ऐकू येतात. पाचवा आवाज मात्र थोडा अस्पष्ट ऐकू येतो. याहून येथील नैसर्गिक सौदर्य मनोहारी, अप्रतीम आणि डोळ्यात भरण्यासारखे आहे. तसेच तेथील सूर्यास्त सुद्धा बघण्यासारखा व अप्रतीम सुंदर असाच आहे.

## इंग्रजांची स्मशानभूमी–

शकर तलावाच्या पूर्वेकडील टेकडीवर इंग्रजाची प्राचीन स्मशानभूमी आहे. इंग्रजांनी गावीलगडावर उत्तरेकडून केलेल्या हल्ल्याची हीच ती जागा आहे. लॉर्ड वेलस्लीने गाविलगडवर केलेल्या हल्ल्यात धारातिर्थी पडलेल्या इंग्रज शिपायांची थडगी अजूनही इथे दिसतात. काही थडगी मात्र नामशेष झाली आहेत. या थडग्यावर लेख लिहलेले आहे. त्यातील L.T.Young यांच्या थडग्यावर "In memory of L.T.G. Young W.M.7th foot who felt at the assault of Gavilgad by Sir Arthur Wellesly on 15th Dec. 1803." इंग्रज सैनिकांबरोबरच इथे मृत्युमुखी पडलेले त्यांचे कुटुंबीय यांचीही थडगी शिलालेखासह पाहावयास मिळतात.

## शिवसागर पॉईंट आणि काळा पाणी तलाव–

अप्पर प्लॅटोकडे जाणाऱ्या रस्त्यावर टेकडी चढण्या अगोदर उत्तरेकडे एक छोटी सडक जाते या सडकेवर पुढे गेल्यास काळा पाणी तलाव दिसतो. या तलावाच्या काठावर छोटेसे राम मंदिर बांधलेले आहे. हा तलाव महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळाने बांधलेला आहे.

ही सडक पुढे थेट शिवसागर पॉईंट पर्यंत जाते. डांबरी रस्ता संपल्यावर पायीच टेकडीची चढण चढावी लागते. या पॉईंट वरून सातपुड्याच्या अनेक पर्वत रांगा दिसतात. तसेच या पॉईंटवरून दिसणार सूर्यास्त विलोभणीय असतो. या पॉईंटवरून हरीकेन आणि गोराघाट या दोन्ही पॉईंटचे दर्शन होते. तसेच येथून डोंगराखालची मोझरी, वस्तापूर इत्यादी गावे शहानूर जलाशय इत्यादी दृष्टीस पडतात.

## महादेवाचे मंदिर–

काळा पाणी तलावापासून ६ कि.मी. अंतरावर महादेवाचे प्राचीन मंदिर आहे. मोझरी गावापासून येथे जाण्यास रस्ता आहे. येथे श्रावण महीन्यातील पाचही सोमवारी मोठी यात्रा भरते. परिसरातील भक्ताची बरीच गर्दी असते.

## देवी पॉईंट–

चिखलदरा बसस्थानकापासून १.५ कि.मी. अंतरावर शकर तलावाच्या बाजूला हा नयनरम्य पॉईंट स्थित आहे. पॉईंट पाहण्यासाठी पायऱ्या उतरून खाली जावे लागते. अतिशय प्रचंड शिलाखंडाच्या खाली देवी विराजमान आहे. प्रत्यक्ष देवीच्या मूर्तीजवळ वाकूनच जावे लागते. पावसाळ्यात शिलाखंडातून सतत पाणी झिरपत असते. तसेच बाजूलाच असलेल्या टेकेडीवरून शकर तलावातील ओव्हर फ्लो चे पाणी पडत असल्याने छानसा धबधबा तयार झालेला आहे. ही देवी आजुबाजुच्या कोरकू बांधवांची श्रद्धास्थान आहे. चैत्र माहिन्यात कोरकू समाजे येथे मोठ्याप्रमाणावर बकरे, कोंबड्या कापून देवीला संतुष्ट करतात.

या पॉईंटच्या रेलींगवरून दरीत कोसळणारा प्रपात, गाविलगडचा काही भाग व मोझरी गावचे विहंगम दृष्य दिसते.

## मोझरी पॉईंट–

हॉटेल ग्रीनच्या बाजूने जाणाऱ्या रस्त्याने २ कि.मी. अंतरावर हा पॉईंट आहे. येथे सद्या कायमचे हेलीपॅड बांधलेले आहे. या पॉईंटवरून उत्तर आणि पश्चिम

दिशेकडील खालचा विस्तीर्ण प्रदेश दिसतो. या पॉईंटवरून मोझरी गावाला जाण्यासाठी पायवाट असल्याने या पॉईंटला मोझरी पॉईंट असे नाव पडलेले आहे. या पॉईंटवरून पूर्वेकडे पाहिल्यास हॉटेल रिसॉर्ट मयूराचे विहंगम दृष्य दिसते. तसेच या ठिकाणाहून देवी पॉईंटचे पठार आणि गाविलगडची पश्चिमेकडील बाजू सुद्धा दिसते. या पॉईंटकडे जाणाऱ्या शेवटच्या वळणावरून पश्चिमेकडील पायवाटेने गेल्यास अविकसित पण सुंदर पॉईंट आहे. तेथून वैराट येथील टेकडी स्पष्ट दिसते.

## राजापाथी –

अप्पर प्लॅटोकडे जाणाऱ्या रस्त्यावर टाऊन हॉलच्या अलिकडे दक्षिणेकडे जाणाऱ्या रस्त्याने गेल्यास एक साधरण उंचीची टेकडी दृष्टीस पडते. या टेकडीलाच राजापाथी म्हणतात. कारण या टेकडीवर गोंड राजाची समाधी बांधलेली आहे. हा राजा भगतसिंह रकमानसिंह माखला व कोच चिखली येथील राजा होता. त्याचा निवास चिखलदरा येथे असतांना सन १९०५ मध्ये त्याचा देहांत झाला. त्याची समाधी आजही बऱ्या अवस्थेत येथे उभी आहे.

## शासकीय उद्यान–

चिखलदऱ्याचा अप्पर प्लॅटो भाग गर्द झाडांनी वेढलेला आहे. या भागातील वस्ती अतिशय विरळ आहे. अप्पर प्लॅटोवर शासकीय उद्यान आहे. हे उद्यान पर्यटकासाठी सकाळी ८ ते सायंकाळी ७ वाजेपर्यंत उघडे असते. या उद्यानाला इंग्रजांनी तयार केले होते. म्हणून त्यास पूर्वी 'कंपनी गार्डन' असे म्हणत. या जागी पूर्वा गवळ्यांची वस्ती होती. ती वस्ती स्थलांतरीत करून पश्चिमेकडील भागात वसवल्या गेली. याच गावाला आता 'पांढरी' असे म्हणतात.

या उद्यानात विविध फुलझाडे, वनस्पती तसेच कॉफीची झाडे आढळतात. शिवाय येथे हनुमान व्यायाम प्रसारक मंडळातर्फे स्विमींग टॅंकची सोय उपलब्ध करून देण्यात आली आहे. उद्यानात चित्ता व अस्वल इत्यादी प्राणी बघावयास मिळतात. उद्यानात गुलाबासाठी खास विभाग राखून ठेवलेला आहे. या उद्यानात फक्त थंड

हेवेच्या प्रदेशात वाढणाऱ्या अनेक दुर्मीळ वनस्पती सुद्धा बघावयास मिळातात. उद्यानात नगरपरिषद चिखलदरा तर्फे मिनी ट्रेन चालविल्या जाते.

## हरिकेन पॉईंट–

चिखलदऱ्याच्या पठरावर दक्षिणेकडे असलेला पॉईंट अप्पर प्लॅटोवर स्थित असून शासकीय उद्यानाच्या जवळच आहे. पॉईंट पाहण्यासाठी काही पायऱ्या उतरून खाली जावे लागते. या पॉईंटवरून गाविलगड किल्ला, मोझरी गाव, वैराटची टेकडी आणि डोंगराखालचा विस्तीर्ण प्रदेश दिसतो.

## गोराघाट पॉईंट–

अप्पर प्लॅटोवरून वैराटकडे जाणाऱ्या रस्त्यावर पांढरी गावाजवळ महाराष्ट्र पर्यटक विकास महामंडळाचे पर्यटक निवास आहे. या पर्यटक निवासात जाणाऱ्या रस्त्याने गोराघाट पॉईंटकडे जाता येते. आजुबाजूला फारशी वरदळ नसल्याने या ठिकाणी शांतपणे बसून निसर्गाचे देखणे रूप न्याहळता येते.

## प्रॉस्पेक्ट पॉईंट आणि ठाकूर पॉईंट–

पांढरी गावाकडे जाणाऱ्या रस्त्यावर दीपशीखा सैनिक शाळा आहे. पर्यटकांनी या शाळेला अवश्य भेट द्यावी. या शाळेपासून एक रस्ता ठाकूर पॉईंटकडे तर एक रस्ता प्रॉस्पेक्ट पॉईंटकडे जातो. प्रॉस्पेक्ट पॉईंटवरून सेमाडोहकडे घनदाट जंगल दृष्टीस पडते.

## मंकी पॉईंट–

वैराटकडे जाणाऱ्या रस्त्यावरच वनविभागाचे प्रशिक्षण महाविद्यालय आहे. या महाविद्यालयाच्या परिसरातच मंकी पॉईंट आहे. पॉईंटवरून सरळ खाली खोल दरी गेलेली आहे. या दरीचा तळ त्यामुळे दिसत नाही. या पॉईंटवर संरक्षणासाठी रेलींग नसल्याने या पॉईंटवर जातांना योग्य तो सावधपणा ठेवणे आवश्यक आहे.

## लाँग पॉईंट–

वैराटकडे जाणाऱ्या रस्त्यावर वन प्रशिक्षण महाविद्यालय सोडल्यावर साधारणपणे २ कि.मी. अंतरावर उत्तरेकडे जाणारी डांबरी सडक आहे. ही सडक चार या आकड्याप्रमाणे दाट जंगलातून जाते. या सडकेवरून मार्गक्रमण करणे हाच एक चित्तथरारक अनुभव आहे. घनदाट जंगल आणि निरव शांतता यामुळे हा पॉईंट दीर्घकाळ स्मरणात राहतो.

## मालवीय तथा सूर्योदय पॉईंट–

चिखलदरा-परतवाड्या रस्त्यावर आय.टी.आय. च्या बाजूने लवादा या गवळ्यांच्या गावाकडे रस्ता जातो. या गावातून जाणारा रस्ता पुढे मालवीय पॉईंटकडे जातो. लवादा गाव मागे पडल्यावर रस्त्याच्या दोन्ही बाजूला असणारे कुरणे फारच छान दिसतात. पॉईंट पाहण्यासाठी थोड्या पायऱ्या उतरून खाली जावे लागते. या पॉईंटवरून भीमकुंडाच्या दरीचा काही भाग आणि परतवाडा शहर दृष्टीस पडते. तसेच गाविलगड किल्ल्याचा पूर्वेकडील बुरूजही दिसतो. हा पॉईंट पूर्वाभिमुख असल्याने येथून सूर्योदय बघणे हा एक वेगळाच अनुभव आहे.

## संग्रहालये–

चिखलदरा येथे दोन संग्रहालये असून त्यापैकी एक संग्रहालय वनविभाग प्रशिक्षण महाविद्यालयात आहे. या ठिकाणी वन्य प्राणी, वनस्पती यांचे नमुने ठेवलेले आहेत. तसेच एक दुर्मीळ 'फॉसील' ही ठेवलेले आहे. दुसरे संग्रहालय व्याघ्र प्रकल्पाचे आहे. त्यासाठी सेमाडोह रस्त्यावर योग प्रशिक्षण केंद्रापासून वळणाऱ्या रस्त्याने आत जावे लागते. याही संग्रहालयात प्राणी व वनस्पती यांचे नमुने प्रदर्शित केलेले आहेत. शिवाय स्थानिक प्रमुख आदिवासी जमात 'कोरकू' यांची संस्कृती दर्शविणारे फलक आहेत.

## शकर तलाव जलक्रीडा–

गाविलगडकडे जाणाऱ्या रस्त्यावर नयनरम्य असा शकर तलाव आहे. या तलावाचे पाणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाद्वारे पाणी पुरवठा योजनेसाठी वापरले जाते. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळातर्फे शकर तलावात जलक्रीडेचीही सोय करण्यात आली आहे. स्पीड बोट, पायडल बोट, स्कूटर बोट इत्यादींचा आनंद पर्यटक इथे घेऊ शकतात.

## सेमाडोह–व्याघ्र प्रकल्प–

मेळघाटात व्याघ्र प्रकल्पाची सुरूवात १९७३ साली झाली. या प्रकल्पा अंतर्गत विस्तीर्ण क्षेत्र समाविष्ट केलेले आहेत. नरनाळा किल्ल्यापासून सुरू होणारे क्षेत्र कोकटू, ढाकणा, सेमाडोह, रायपूर, डोमापर्यंत पसरलेले आहे. चिखलदरा ते सेमाडोह हा २५ कि.मी. चा रस्ता गर्द आणि घनदाट जंगलानी वेढलेला आहे. या रस्त्यावरून नुस्ता प्रवास केला तरी मन ताजेतवाने होते. या रस्त्याने प्रवास करतांना मोर, डुकरे, कोल्हे, हरीण, गवे इत्यादी वन्य प्राणी पाहावयास मिळतात.

सेमाडोह येथे व्याघ्र प्रकल्पाचे संकूल आहे, या निवास संकुलात अल्पदरात राहण्याची सोय होऊ शकते. या संकुलातही संग्रहालय आहे. वन्य जीवनावरचा स्लाईड-शो येथे दाखविला जातो.

संध्याकाळी चार वाजता तसेच सकाळी पाच वाजता व्याघ्र प्रकल्पाच्या मिनी बसद्वारे संरक्षीत क्षेत्रात फिरण्याची सोय करण्यात येते. त्यासाठी पर्यटकांना भाडे भरावे लागते. संरक्षीत क्षेत्रात चिता, वाघ, अस्वल, रानगवे, हरणे, कोल्हे, विविध पक्षी आणि साप इत्यादींचे दर्शन होते.

नैसर्गिक सौंदर्याचा आस्वाद घेण्याकरिता ह्या स्थळांना आवर्जून भेट द्यावी अशीच ही ठिकाणे आहेत. तरच चिखलदऱ्याची यात्रा पुर्ण झाल्याचे समाधान !



# नरनाळा किल्याचा नकाशा




Shirpur Gate
Khamb Talao
Patalganga Talao
Chandravati Talao (ईमली तलाव)
Delhi Bate
Jafrabad Fort
थडगे
Shakkar Talao
मसीद
दरबार हॉल (अंबर महल)
Sagar Talao (दमयंती तलाव)
Moti Talao (मोठा तलाव)
Ram Talao (धोबी तलाव)
मसोबाचा ओटा
Ambar Khana (तेल तुपाचे टाके)
Highest Point
Tolia Garh
Mahakali Gate
Mendha Gate
Akot Gate
Shahanur Gate
To Akot

# १. नरनाळा

सातपुड्याच्या कुशीत विदर्भाची वास्तुशिल्पे व संस्कृती यांचे निदर्शक असलेली बरीच प्राचीन स्थळे, मंदिरे आणि किल्ले आहेत. त्यांत अकोला जिल्ह्यातील नरनाळा उर्फ शहानूर हा भारतातील प्राचीन किल्ल्यापैकी एक महत्वाचा आणि प्रसिद्ध किल्ला आहे.

महाराष्ट्राच्या जडणघडणीत सह्याद्री आणि सातपुड्याच्या कुशीत असलेल्या किल्ल्यांचे अन्यन्य साधारण असे महत्व आहे. यातील बहुतांश किल्ले आजही उपेक्षीत आहेत. त्यापैकी नरनाळा हा एक किल्ला होय. मेळघाट या वऱ्हाडातील सर्वांत डोंगराळ प्रदेशात सातपुड्याच्या शिखरावरील हा इतिहास प्रसिद्ध किल्ला दूर्गम व अरण्यमय आहे. येथे कोरकू, गोंड आणि भिल्ल लोकांची वस्ती आहे.

नरनाळा आकोट ह्या तालुक्याच्या ठिकाणापासून २४ कि.मी. अंतरावर; तर अकोला ह्या जिल्ह्याच्या ठिकाणापासून ६६ कि.मी. उत्तरेस आहे. आकोट तालुक्यातील सातपुडा पर्वताच्या मेळघाट भागात एका मोठ्या आणि विस्तीर्ण अश्या सपाट टेकडीचा उपयोग करून त्यावर हा किल्ला बांधण्यांत आला आहे. मेळघाट पासून काही अंतररावर २१°. १० उत्तर अंक्षाश आणि ७७°.०० पूर्व रेखांशावर हा किल्ला स्थित आहे. येथे अकोला जिल्ह्याचे भौगोलिक रूंदी काही प्रमाणांत अरूंद झालेली दिसते आणि म्हणूनच हा भाग जिल्ह्याचे मुख किंवा प्रवेशद्वार म्हणून ओळखले जाते. किल्ल्याची समुद्रसपाटी पासून उंची ३,१६१ फुट असून किल्ला सुमारे ३९२ एकर जागेत पसरलेला आहे. ह्या किल्ल्यांच्या तटबंदीचा घेरा २४ मैलाचा आहे. किल्ल्याची तटबंदी ही तेथील भौगोलिक संरचना आणि ऊन, वारा, पाऊस ह्या नैसर्गिक बाबी लक्षांत घेऊन शास्त्रीय दृष्टीकोनातून बांधलेली केल्याचे जाणवते. किल्याच्या तटबंदीच्या विशाल घेरामुळे त्यामुळे तेथील इमारती शोधतांना बराच त्रास होतो आणि बराच कालावधीही लागतो. ह्या किल्यातील एकूण एक वास्तू बघावयाच्या झाल्यास त्या एका दिवसांत बघणे अशक्यच. आजही किल्याची तटबंदी काही प्रमाणांत चांगल्या स्थितीत असली तरी

इतर इमारती आणि अन्य स्थळे हळू हळू नष्ट होत आहेत. बऱ्याच इमारती उंच उंच गवतानी आणि झाड़े-झुडपांनी वेढलेल्या आहेत.

विदर्भात किल्यांची संख्या फारशी नाही आणि त्यातही ज्ञात असलेले किल्ले फारसे महत्वाचे नाहीत असे माणणारा एक विद्वावानांचा गट आहे. परंतु सदर मत पूर्णत: मान्य करण्यासारखे नाही. कारण स्वत: लेखकाने तयार केलेल्या सूची नुसार विदर्भात एकूण ९७ किल्ले असून त्यापैकी १८ किल्ले हे केंद्र व काही राज्य शासनाच्या पुरातत्व विभागाचे संरक्षित किल्ले (स्मारके) आहेत. ह्यांत अंबागड, माणिकगड, प्रतापगड, वैराळगड, गाविलगड, नरनाळा ही गिरीदुर्ग आणि चंद्रपुर, बल्लारपूर, भांदक, बाळापूर, अचलपूर, पवनार, भीवगड, डोंगरतळ इत्यादी स्थलदुर्ग ही विदर्भाचे भूषणे आहेत. फरक काय तो दृष्टीचा आणि विचाराचा आणि म्हणूनच वरील काही विद्वानांच्या मताचा पोकळपणा स्पष्ट होतो. विदर्भातील किल्ले बघता ते ऐतिहासिकदृष्ट्या केवळ महत्त्वाची आहेत असे नव्हे तर ती स्थापत्य कलेच्या दृष्टीने सुद्धा महत्त्वाची आहेत.

वरील सर्व किल्ल्यांत नरनाळा प्राचीन व संरक्षणाच्या दृष्टीने भक्कम. व मजबूत असा आहे. आपल्या ऐतिहासिक कालखंडात अजिंक्य ठरलेला हा किल्ला आज काही प्रमाणांत उपेक्षित असाच आहे. किल्यावर झाडे झुडपे वाढली असून इमारती व तटावरील वाढलेल्या झाडांच्या खोलवर गेलेल्या मुळांमुळे त्या इमारती व बहुसंख्य बुरूज जर्जर झाले आहेत.

सातपुडा पर्वत रांगेत पूर्व-पश्चिम अशा सरळ रेषेत असलेले तीन लहान किल्ले मिळून हा भव्य किल्ला बनलेला आहे. पूर्वेकडील जाफराबाद, मध्यभागी असलेला मुख्य नरनाळा आणि पश्चिमेकडील तेलीयागड. तेलीयागड आणि जाफराबाद गडास तटबंदी बुरूज व लहान दरवाजा या व्यतिरिक्त तिथे उल्लेखित करण्यासारखी एकही इमारत आज शिल्लक नाही.

सातपुड्याच्या कुशीत लपलेल्या ऐतिहासिक नरनाळा किल्यास पोहचण्याकरिता आकोट ह्या तालुक्याच्या ठिकाणापासून पोपटखेड मार्गे बारमाही पक्का रस्ता आहे. पोपटखेड्यापासूनच डोंगरदऱ्यांत असलेल्या 'नरनाळा' किल्ल्याचे विहंगम दृश्य नजरेच्या बाहुलीत स्पष्टपणे जवळीक साधत असल्याचे जाणवते. पोपटखेड्यानंतर

बोरडी शहानूर मार्गे किल्यापर्यंत पोहचण्याकरिता मुख्य रस्ता आहे. शहानूर येथे जिल्हा परिषदेचे छोटेखानी विश्रामगृह आहे. हे खेडे किल्ल्यांच्या पायथ्याशी असलेले असून येथे थोडी विश्रांती घेऊनच किल्ल्यांची चढण चढण्यास सुरूवात करावी. उंच उंच पर्वतराजीची लाबंच लांब रांग, सर्वत्र हिरवी वनश्री बघुन कधी नरनाळ्याच्या अंगखांद्यावर जावून पोहचतो याची उत्सुकता वाढल्याशिवाय राहत नाही. येथील नैसर्गिक देखावा पावसाळ्यांत आणि हिवाळ्यांत फारच विलोभनीय दिसतो. पर्वत उतरणीवरील हिरवीगार वनश्री उंच सखल पर्वत रांगा, धुळ आणि धुके विरहीत स्वच्छ वातावरण, किल्यावरून दिसणारी पायथ्यावरील खेड्यातील लहान घरे, पाण्याचे धबधबे, उतरणीवरील जलमार्ग आदि निसर्गाची लयलूट मनाला मोहित केल्यावाचून राहत नाही.

शहानूर गावापासून किल्ल्याच्या चढणीस सुरूवात होते. पायी प्रवास केल्यास किल्ल्यापर्यंत पोहचण्याकरिता सुमारे एक तासाचा अवधी सहज लागतो. परंतु आता किल्यांपर्यंत वाहने जाऊ शकतील असा रस्ता तयार करण्यांत आला आहे. शहानूर पासुन सुमारे अर्धा रस्ता ओलांडून गेल्यानंतर रस्त्याच्या दोन्ही बाजूस युद्धात विरगती पावलेल्या योद्धयांच्या समाधी दृष्टीस पडतात, त्यास 'सतीचे मैदान' म्हणून ओळखले जाते. त्याचे निर्देशक शिल्प म्हणून वर उचललेल्या स्त्रीचा हात आणि त्यांच्या बाजूस सूर्य आणि चंद्रकोर कोरलेले आहे. जोपर्यत भूतलावर सूर्य-चंद्र आहे तो पर्यंत ह्या योद्धयांची किर्ती, स्मृती, सदैव स्फूर्तीदायक, अजरामर राहो हाच सदर शिल्प कोरण्याचा मुख्य उद्देश दिसतो. ह्याविषयी असे ही म्हटले जाते की, औरंजेबाच्या वेळेस येथे युद्ध होऊन किल्यातील रयत मोठ्या प्रमाणात मारल्या गेली होती. त्यांच्या स्मृतीकरिता हे धडगे उभारल्या गेले, म्हणून ह्या स्थळांस ''मृत्यूचे मैदान'' म्हणून सुद्धा ओळखले जाते.

संपूर्ण किल्ला हा भक्कम तटबंदीने सुसज्ज असा आहे. दुरून किल्ल्याची तटबंदीच्या खालची रांग दुरून काळ्या पाषाणात उभारलेल्या लांबच लांब काळ्या भिंती सारखी दिसते किल्ल्याची तटबंदी नैसर्गिक आणि बांधीव अशी संमिश्र स्वरूपाची आहे. पहिल्या प्रवेशद्वारावरील माथ्याचा भाग हा बराच उंच आहे. तसेच त्या दरवाजा

आणि त्याच्या कमानी हत्ती सहजगत्या प्रवेश करू शकेल एवढ्या उंच आहेत. काही ठिकाणी तर ह्या किल्ल्यास केवळ नैसर्गिक तटबंदी प्राप्त झाली आहे. किल्ल्याच्या भिंतीला खाली सरळसोट उतरता पाषाणाचा कडा निसर्गतः लाभलेला असेल तेथे पुन्हा कृत्रिम तटबंदी उभारण्याची संरक्षणदृष्ट्या आवश्यकता वाटली नसावी. तटबंदी उभारण्यास काळ्या बेसाल्ट दगडाचा वापर करून तटबंदीच्या भिंती संरक्षणदृष्ट्या मजबूत आणि उत्कृष्ट अश्या बांधल्या आहेत. ही तटबंदी काही ठिकाणी दुहेरी तर काही ठिकाणी तिहेरी अशी संरक्षणदृष्ट्या भक्कम मजबुत अशी उभारलेली आहे. सभोवतालच्या तटाची उंची जागेनुसार २५ फुटा पासून ४० फुटापर्यंत असून त्यांत एकून ६७ बुरूज आहेत. त्यांत खुनी बुरूज व तेलिया बुरूज विशेष प्रसिद्ध आहेत.



# १०. इतिहास

**बहमणी –**

नरनाळा किल्ल्याच्या उभारणीविषयी विद्ववानांमध्ये मतभेद आहेत. फेरिस्ता या इतिहासकाराच्या मते बहमणी घराण्यातील नववा बादशहा शहाबुद्दीन अहमदशहा वली (इ.स. १४२२ ते १४३६) याने इ.स. १४२५ मधील आपल्या ईलीचपूर येथील मुक्कामात गाविलगड किल्याची उभारणी करून नरनाळा किल्ल्याची दुरूस्ती केली आहे. ह्यावरून ह्या किल्ल्याची उभारणी बहमणी काळापूर्वीच झाली होती हे स्पष्ट होत असले तरी ह्या किल्याची उभारणी नेमकी केव्हा झाली हे पुराव्याअभावी निश्चितपणे सांगता येत नाही.

काही इतिहासकारांच्या मते मेळघाट भागात राज्य करणाऱ्या गोंड शासकांनी ह्या किल्यांची प्रथम उभारणी केली असावी असा एक मतप्रवाह आहे. परंतु सदर मत सुद्धा पूर्णत: विश्वासनीय वाटत नाही, आणि सर्वमान्यही नाही. त्या अर्थी हा किल्ला बहामणी काळापूर्वीचा आहे एवढेच विधान तुर्त करता येते.

अहमदशहा वली नंतर त्याचा मुलगा अल्लाउद्दीन अहमदशहा दुसरा (इ.स. १४३६ ते १४५८) गादीवर आला. त्यांचे खानदेशचा सुभेदार नाशीरखानच्या मुलीशी लग्न झाले होते. ती 'मालीका-ऐ-जहान' या नावाने ओळखली जात असे. 'मालीका-ऐ-जहान' ने तिचे वडील नाशीरखान यांचेकडे तक्रार केली की, अल्लाउद्दीन माझी उपेक्षा व अनादर करतो. त्यामुळे दोन कुटुंबामध्ये बेबनाव निर्माण झाला. सुरूवातीस नाशीरखानाने ह्याप्रकरणाकडे दुर्लक्ष केले. परंतु दोन कुटुंबातील भांडण विकोपाला गेल्यामुळे नाशीरखानाने सैन्याची (घोडदळ, पायदळ) जमवाजमव करून इ.स. १४५३ मध्ये (बदला घेण्याच्या दृष्टीने) बेरार ह्या प्रांतावर स्वारी केली. त्याने प्रथम खेरल्याचा गोंड राजा यास पराजित करून खेरला किल्ला आपल्या ताब्यात घेतला. त्यानंतर बेरारमधील काही सरदार आपल्या बाजूने वळवून नरनाळ्यावरील मोहिमेची पकड घट्ट केली. नासीरखानाने ह्या मोहिमेत अनेक हेतू साध्य करून घेतले. त्यांने ह्या प्रांतातील

राजद्रोह्यांची नोंद घेतली. तसेच बेरारचा इलाखाधिपती आणि सैन्याचा मुख्य यांस आपल्या बाजूने वळवून घेतले. जे आपल्या धन्याचे अत्यंत विश्वासू सेवक होते ते नाशीरखानाच्या योजनेबद्दल अगदी अनभिज्ञ होते आणि त्यामुळे इ.स. १४५३ च्या सुमारास 'नरनाळा' किल्ला नाशीरखानाच्या ताब्यांत येण्यास त्याला फारसे श्रम करावे लागले नाही.

नरनाळ्यासारखा महत्वाचा किल्ला नाशीरखानाने ताब्यांत घेतला असे अल्लाउद्दीन अहमदशहाला कळताच त्याने प्रतिहल्ल्याची तयारी केली आणि दौलताबादचे सुभेदार मलीक तुज्जार आणि खलप हसन बसरी यांना बेरारच्या बंदोबस्ताचे आणि नाशीरखानाच्या बंडाचा बिमोड करण्याचे आदेश दिले. त्यानुसार मध्य आशियातून आलेली, पार्शीयन, अरब, तुर्क मोगल, सिद्धी (हबसी) आणि स्थानिक सेना सोबत घेऊन मोहीम आखण्यांत आली. खलप हसनने इलिचपूर प्रदेशाच्या संरक्षणाकरिता काही दरबारी सैन्य रवाना केले. बाळापूरच्या संरक्षणाकरीता मेळघाटातील कोरकू सेना पाठविण्यांत आली आणि स्वत: खलप हसनने रोहीनखेडच्या उत्तरेच्या बाजूने बुलढाण्याकडे कूच केली. बुलढाणा परिसरातील पर्वत रांगेत दोन्ही सैंन्यात घनघोर युद्ध होऊन त्यांत नाशीरखानाचा संपूर्णपणे पराजय झाला आणि तो बऱ्हाणपुराकडे पळून गेला. खलप हसनने त्याचा पाठलाग केला. परंतु नाशीरखानाने खानदेशातील किल्ल्यात आसरा घेतला. ह्या दरम्यान बऱ्हाणपुरातील उत्तमोत्तम इमारतीची आक्रमकांनी बरीच नासधूस केली. जेव्हा खलप हसन दक्षिणेकडे परतायला लागला त्यावेळी पुन्हा सर्व शक्तिनिशी नाशीरखानाने खलप हसनच्या सैन्यावर हल्ला केला. त्यात तो यशस्वी होऊ शकला नाही. आणि त्याला पुन्हा पराजय पत्करावा लागला अशाप्रकारे नाशीरखानाच्या बंडाचा बिमोड करण्यात अल्लाउद्दीन अहमदशहाच्या सैन्यास यश मिळाले. पुन्हा अन्य प्रदेशाप्रमाणे नरनाळा किल्ला अल्लाउद्दीनकडे आला.

## इमादशाही–

बहमणी राज्याच्या अस्तानंतर दक्षिणेत मुसलमान सरदाराची पाच राज्ये निर्माण

झाली. त्यावेळी वऱ्हाडचा सुभेदार फत्तेउल्ला इमाद उल्मुल्क हा होता. त्याने बहमणी राज्यातून बंड करून अन्य चार शाह्याप्रमाणे फत्तेउल्लाने स्वत:स स्वतंत्र शासक घोषित करून इ.स. १४९० मध्ये वऱ्हाडात स्वतंत्र इमारदशाची स्थापना केली. त्यावेळी नरनाळा हा किल्ला त्याच्या ताब्यांत होता आणि उत्तेरकडील मोहिमा थोपवून ठेवण्याचे प्रमुख कार्य नरनाळ्या किल्ल्यातूनच होत असे त्यामुळे इमादशाहीत ह्या किल्ल्यास अन्योन्यसाधारण असे महत्व प्राप्त झाले होते. इमादशहाचे वऱ्हाडावर सुमारे ७० वर्ष राज्य होते. ह्या घराण्याचा शेवटचा राजा बुऱ्हाण इमादशहा हा होय.

इमादशहा देरीया १५२० ला मरण पावल्यानंतर बुऱ्हाण गादीवर आला. बुऱ्हाण मोहीमांवर असतांना मुख्य प्रधान तुफालखान कारभार पाहत असे. अश्याच एका लढाई वरून बुऱ्हाण इमादशहा परत आल्यावर यास त्याच्याच राज्यातील मुख्य प्रधान तुफालखानाने दग्याने बुऱ्हाणशहास नरनाळ्या किल्यांत इ.स. १५६० मध्ये कैद करून इमादशहाचे सिंहासन हस्तगत करून स्वत: इमादशाहीच्या गादीवर बसला. ह्या कार्याकरिता तुफालखान यांस गोवलकोंड्याचा इब्राहीम कुतुबशहा आणि खानेदेशच्या सुलतानाची बरीच मदत मिळाली होती. किंबहुना त्यांच्याच संगनमताने त्याने इमादशहाचे सिंहासन हस्तगत केले आणि तुफालखानाने त्यांचे स्वामित्व स्वीकारले येथूनच इमादशाही घराण्याच्या ऱ्हासास सुरूवात झाली.

## निजामशाही-

इ.स. १५६५ मध्ये अहमदनगरचा-मुर्तिजा निजामशहा आणि विजापूरचा-अली आदीलशहा यांनी वऱ्हाडावर आक्रमणे करून इलिचपूरच्या उत्तरेकडील म्हणजेच नरनाळ्याच्या परिसरात बराच उपद्रव केला आणि ह्या प्रदेशाची बरीच नासधूस केली. म्हणून तुफालखानाने दोघांशीही समझोता करून साम्राज्यावर आलेल्या संकटातून स्वत:ची सुटका करून घेतली. परंतु हा समझोता फार दिवस टिकला नाही. अवघ्या सात वर्षानंतर इ.स. १५७२ मध्ये तुफालखान आणि मूर्तिजा निजाम शहा याच्यांत बेबनाव निर्माण होऊन त्याचे पर्यावसन युद्धात झाले. मूर्तिजाने वऱ्हाड प्रांत आपल्या ताब्यांत घेण्याच्या दृष्टीने पद्धतशीरपणे कार्यवाही केली. तो तुफलखानाचे मागे न

लागता एके जागी तळ देऊन राहिला. वऱ्हाडातील देशमुख, देशपांडे आणि वतनदार ह्यांना विश्वासात घेतले व त्यांना ह्या मोहिमेपासून त्रास होणार नाही असा विश्वास दिला. मुर्तीजा हा 'दिवाना' म्हणजे वेडा म्हणून प्रसिद्ध होता. मूर्तिजाकडून आश्वासन मिळताच सर्वच वतनदार निजामशहास अनुकूल झाले. मर्तिजा निजामशहाने इलिचपूरच्या बाजुने उत्तरेकडे कूच केली. तुलफखान याने सुद्धा त्याचा मुलगा समशीर उलमुल्क यांचेशी संगनमत करून मूर्तिजास सैन्याच्या सामोरे जाण्याची तयारी केली. दोन्ही सैन्याचे नरनाळ्याच्या परिसरात युद्ध होऊन त्यांत तुफालखानाचा पूर्णत: पराजय झाला. म्हणून त्याने आणि त्याच्या मुलाने खानदेशाच्या बाजूने पळ काढला. सुमारे सहा वर्ष तो जंगलात भटकत होता. त्यानंतर तो खानदेशाच्या मिरून महंमदशहाकडे आशीरगडावर आश्रयासाठी गेला. परंतु मुर्तिजाने तुफालखानास आश्रय न देण्याची ताकीद मिरूर महमंदशहास दिल्यामुळे त्यास आशीरगडावर आश्रम मिळाला नाही. परिणामी तुफालखानास नरनाळा किल्ल्यांत परत यावे लागले. दरम्यान त्याने बादशहा अकबराकडे सुद्धा मदतीची याचना केली. परंतु त्यांत त्याला यश आले नाही.

तुफालखान नरनाळ्यांत आहे असे कळताच मूर्तिजा निजामशहाच्या सैन्यांने किल्ल्यास पूर्णपणे वेढा घातला आणि अल्पश: प्रयत्नानेच नरनाळा किल्ला अहमदनगरच्या मूर्तिजा निजामशहाच्या ताब्यांत आला. मूर्तिजाने तुलाफखान आणि अन्य चाळीस जबाबदार व्यक्तींना कैद केले.

नरनाळा ताब्यांत घेण्याविषयीची हकीकत अशी की, जेव्हा तुलाफखानास अकबराकडून मदत मिळणार नाही असे मूर्तिजास कळताच त्याने किल्ला ताब्यांत घेण्याविषयीच्या कार्यवाहीस अधिक गती दिली. वेढ्यावरील तोफा नरनाळ्याच्या तंटबंदीच्या अगदी जवळ आणून, तटबंदीवर मारा करून भगदाड पाडण्याचे काम जिकरीने करण्यांत आले. परंतु किल्ला संरक्षणाच्या दृष्टीने मजबूत असल्यामुळे यश येईना. तेव्हा एके दिवशी अफगाण व्यापारी घोडे आणि अन्य युद्ध सामुग्री घेऊन शिबिरात दाखल झाला. त्याने तुलाफखानाच्या हुकुमावरून सदर सामुग्री आणली होती. त्याने ही सामुग्री तुलाफखानाच्या स्वाधीन करण्याची मूर्तिजाकडे अनुमती मागितली. हा प्रसंग युद्धाच्या निर्णायक अवस्थेत प्रवेश करण्यास बाका आहे असे



गडावरील तोफ



मेहंदी दरवाजा

मूर्तिजा निजामशहाचा चाणाक्ष मुख्य सल्लागार चंगीजखानाने ताडले आणि त्याने अनुमती देण्याबाबत मूर्तिजाकडे आग्रह धरला. दरम्यान व्यापाऱ्यास आपल्याकडे वळविण्यात चंगीजखानास यश आले आणि त्यांने आमचे स्वामित्व स्वीकारावे ह्या अटीवर त्यास अनुमती देण्यात आली. व्यापाऱ्याच्या युद्ध सामुग्री सोबतच आपले काही निवडक सैन्य चंगीजखानाने सोबत पाठविले आणि ह्या संधीचा पुरेपुर फायदा घेऊन निजाम सैन्याने बाहेरून आणि आतून एकदम मारा केला. त्यामुळे तुलाफखानाचे फारच कमी असलेले सैन्य पळून जाऊ लागले. त्यानंतर तुलाफखानाचा पाठलाग करून त्यास पकडून कैद करण्यांत आले. तसेच तुफालखानाने कैद केलेला बुऱ्हाणइमादशहा आणि अन्य इमादशाही घराण्यातील व्यक्ती ह्याच किल्यात होत्या. त्यांना सुद्धा कैद करण्यात आले. मुर्तिजा निजामशहाने त्यांची रवानगी अहमदनगरच्या किल्याकडे केली आणि इमादशाहीतील सुमारे ४० व्यक्तींना आपल्या सोबत नेले काही दिवसातच त्या सर्वांचा मृत्यू झाला अशी नोंद आहे. पण त्यांच्या मृत्यूविषयी इतिहासकारात मतभेद आहेत. त्यांचा मृत्यू नैसर्गिक कारणानी झाला की, अन्य कारणानी झाला ह्या विषयी निश्चितपणे सांगता येत नाही. 'फेरीस्ता' ह्या इतिहासकाराच्या मते सर्व लोक एकाच रात्री मेले. काही इतिहासकारांच्या मते एककेकाची नरडी दाबुन सर्वाचा खून करण्यांत आला. तर काहींच्या मते सर्वच लोकांना खिडकी नसलेल्या लहान खोलीत (अंधार कोठडीत) डांबून ठार करण्यांत आले. काही इतिहासकांराच्या मते,-मूर्तिजाच्या आदेशानेच सर्वांना विष देऊन मारण्यांत आले. तर काहींच्या मते ते कैदेत असतांनाच त्यांचा मृत्यू झाला. अश्याप्रकारे इ.स. १५७२ मध्ये वऱ्हाडच्या पहिल्या व शेवटच्या स्वतंत्र राज्याचा (इमादशाहीचा) अंत झाला व नरनाळा (वऱ्हाड) अहमदनगरच्या निजामशाही राज्यात सामील झाला.

अहमदनगरच्या निजामशहाविरूद्ध बादशहा अकबराने इ.स. १५९६ मध्ये सुलतान मुरादच्या नेतृत्वाखाली वऱ्हाड प्रांत जिंकण्यासाठी बादशाही सेना पाठविली. ह्या दरम्यान खान-ए-खानन-याने युद्धात पराकाष्टा करून लहान मोठे किल्ले जिंकण्यासाठी सैन्य पाठविले. दरम्यान त्याने निजाम सोहीलखानाचा पराभव केला. परंतु मुराद आणि खान-ए-खानन यांच्यात असलेल्या भांडणामुळे खान-ए-खानन

यांस अकबराने दिल्लीस परत बोलाविले आणि त्याच्या ठिकाणी शेख अबुल फजल याची नेमणूक करण्यांत आली. त्याने इ.स. १५९८ साली नरनाळा जिंकून मोगल साम्राज्यात समाविष्ट केला. आणि त्याने ह्या प्रदेशातील बरेच क़िल्ले ताब्यांत घेतले. नरनाळा जिंकल्यानंतर आग्रास परत जात असताना त्यास रस्त्यातच विश्वासघाताने ठार मारण्यांत आले. नंतर सुलतान मुराद सुद्धा दारू पिवून नशेतच मरण पावला. नंतर हा किल्ला औरंगजेबाच्या ताब्यात काही काळ होता त्यावेळी त्याने ह्या किल्याची बरीच डागडूजी केल्याचा उल्लेख मिळतो. मोगल साम्राज्यास उतरती कळा लागल्या नंतर हा किल्ला हैद्राबाद रियासतीच्या ताब्यात गेला.

## भोसले-

कालांतराने हा किल्ला शिवाजी महाराजांचे वंशज असलेल्या मराठ्याक्डे आला आणि त्यांनतर त्यांचे उत्तराधिकारी पेशवे यांचेकडे गेला. इ.स. १७०७ मध्ये शाहू दक्षिणेत परतल्यानंतर परसोजी भोसले हा पहिला मराठा सरदार आहे की, त्याने शाहूच्या गटात सामील होऊन त्यास मदत केली आणि मध्यप्रदेशच्या उत्तरेकडील सीमा सुरक्षित केल्या म्हणून परसोजीस वऱ्हाड प्रातांची जहांगिरी देऊन वऱ्हाडचा सेना साहेब सुभा नेमण्यात आले. त्यांत सरकार (जिल्हा) नरनाळा ह्या भागाचा समावेश होता. परसोजी नंतर नागपूरकर भोसला पहिला रघुजी राजे भोसले याने इ.स. १७५२ मध्ये नरनाळा किल्ला आपल्या साम्राज्यात समाविष्ट केला. रघुजीनंतर पुन्हा एकदा हा किल्ला निजामाकडे गेला. इ.स. १७७५ दरम्यानचा काही काळ सोडला तर इ.स. १८१८ पर्यंत तो नागपूरक र भोसल्यांच्या ताब्यांत होता आणि त्यानंतर अंतिमत: ब्रिटिशाकडे गेला.

काही इतिहासकारांच्या मते, संपूर्ण इतिहासात ह्या किल्ल्यांवर फार मोठी लढाई होऊन हा किल्ला हस्तगत केल्याचे कधीच घडले नाही. हा किल्ला दि.६ जानेवारी १८१८ च्या तहान्वये गाविलगड किल्ल्यासोबतच ब्रिटीशाकडे हस्तांतरित करावा लागला अश्या प्रकारे नरनाळ्यावर ईस्ट इंडिया कंपनीचा ध्वज फडकला आणि नरनाळा पारतंत्र्याचे चटके भोगू लागला.



# ११. वास्तु शिल्प

## दरवाजे–

ह्या किल्ल्यास एकून लहान-मोठे २२ दरवाजे आहेत त्यापैकी दिशेकडील चार दरवाजे मुख्य आणि महत्वाचे आहेत.

१) शहानूर दरवाजा (शेर दरवाजा) २) आकोट दरवाजा ३) शिरपूर दरवाजा आणि ४) दिल्ली दरवाजा. ह्या दरवाजाचा उपयोग बाहेरून ये-जा करण्याकरिता प्रामुख्याने होत असे; तसेच ते बाहेरील तटबंदीस असल्यामुळे किल्ल्याच्या संरक्षाणाकरिता सुद्धा त्यांचे महत्त्व मोठे होते. त्यामुळे ह्या दरवाज्यास किल्ल्यांच्या आंतील सुरक्षितेकरिता सतत चौक्या बसविल्या जात असत. ह्याशिवाय मेंढा दरवजा, मेंहदी दरवाजा, महाकाली दरवाजा, तेलीयागड दरवाजा, नरनाळा आणि जाफराबाद दरवाजा इत्यादी आंतील दरवाजे प्रसिद्ध आहेत. आंतील दरवाज्याचा उपयोग शत्रुसैन्यापासून अचानक उदभवलेल्या संकटसमयी स्वसरंक्षणासाठी होत असे.

## शहानूर दरवाजा–

हा दरवाजा 'शेर दरवाजा' या नावानेही ओळखला जातो. दरवाजा पूर्वाभिमूख बांधणीचा असून त्याच्या दर्शनी भागावर दोन्ही बाजूस प्रत्येकी एका व्याघ्राचे शिल्प असून त्यांची दृष्टी एक दुसऱ्याकडे टक लावून बघत असल्यासारखे कोरले आहे. ह्या दरवाज्याची बांधणी काळ्या बेसाल्ट पाषाणातील असून तो तीन कमानीयुक्त स्थापत्य रचनेत आहे. दरवाज्यात दोन्ही बाजूस प्रत्येकी एक चावडी आहे. प्रत्येक चावडीस चार चौकोनी आकारांचे स्तंभ आहेत. दरवाज्याचे छत लहान-लहान आकाराच्या पाषाणात कोरले असून ते झुंबराप्रमाणे सुशोभित केले आहे. स्थापत्य कलेचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून ह्या दरवाज्याचा उल्लेख करावा लागेल. दरवाज्याच्या मागील बाजूवर कमानीच्या वरच्या भागात दोन्ही बाजूस एक-एक व्याघ्राचे शिल्प आहे. त्यातील एक जेता आहे तर दुसरा पराजित अवस्थेतील आहे. विजयी वाघाचे शिल्प

त्याच्या विजयी भावमुद्रेवरून स्पष्ट होते तर दुसऱ्या बाजुकडील पराजित वाघ हा शेपटी लपवून पळण्याच्या स्थितीत दाखविले आहे. किल्याचे हे पहिले प्रवेशद्वार असून त्याची उंची हत्ती सहजगत्या प्रवेश करू शकेल ऐवढी आहे.

ह्याच प्रवेशद्वाराच्या दुसऱ्या बाजूस पडद्यासारखी योजना केली आहे. त्यास "सहा गोट्याची छपरी" असे म्हटले जाते. ती सुमारे ३० फूट उंच असून तिचे बांधकाम सहा मोठे पाषाण एक दुसऱ्यावर ठेवून बणविलेले आहे.

ह्या दरवाज्यानंतर त्याच बाजूने एकाच रस्त्यावर अन्य दोन दरवाजे आहेत. त्यातील एकास मेंढा दरवाजा व दुसऱ्यास मेंहदी दरवाजा ह्या नावाने ओळखले जाते. ह्यातील सर्वात बाहेरचे आणि प्रथम दर्शनी असलेले प्रवेशद्वार म्हणजेच हा शहानूर दरवाजा होय. हा दरवाजा ह्या किल्याचा दक्षिणेकडील प्रथम व प्रवेशाच्या मुख्य दरवाज्यापैकी आहे. त्याची बांधणी अगदी साध्या स्थापत्य रचनेत केली आहे. दरवाज्याच्या बांधकामावरून आणि स्थापत्य पद्धतीवरून ह्या दरवाज्याचे बांधकाम मोगलांपूर्वीचे गोंडकालीन असावे असा कझिन्सने उल्लेख केला आहे. परंतु दरवाज्याचे बांधकाम हे गोंड काळातील असावे ह्याविषयी शंकेस वाव आहे.

ह्या दरवाज्याच्या भिंतीच्या बांधकामाची रचना, मोठ-मोठे अवघड पाषाणाच्या सहाय्याने केलेले बांधकाम बुरूज ह्यावरून ह्या दरवाज्याचे बांधकाम मुसलमान काळापूर्वीचे किंबहूना बहमणी काळापूर्वीचे असावे असे वाटते. येथील काही भिंती तर सहा-सहा फूट रूंदीच्या आहेत. भिंतीचे बांधकाम चिखल, चुना, आदींचा जोडणी करीता वापर न करता दगड एक दुसऱ्यावर ठेवून स्वच्छ अश्या पद्धतीनुसार केले आहे. या दरवाज्याचा दर्शनी भाग मोठ्या सुबकतेने सजविला आहे.

## महाकाली (मुहम्मदी) दरवाजा-

मेंढा व मेंहदी दरवाज्यातून प्रवेश केल्यानंतर महाकाली दरवाज्याचे दर्शन होते. हा किल्ल्याच्या आंतील दरवाज्यापैकी संरक्षणाच्या दृष्टीने महत्वाचे प्रवेशद्वार होय. अत्यंत कलाकुसरयुक्त असलेले हे द्वार किल्यातील संपूर्ण दरवाज्यात हा एक उत्कृष्ट कलाकुसरीचे काम केलेला दरवाजा आहे. शिल्पकलेचा एक उत्कृष्ट नमुना म्हणूनच

ह्या दरवाज्याचा नामोल्लेख करावा लागतो. एवढेच नव्हे तर अख्या महाराष्ट्रातील किल्ल्यात असे कलाकुसरीचे प्रवेशद्वार क्वचितच बघावयास मिळते.

हा दरवाजा ''महाकाली दरवाजा'' या नावाने तसेच ''मुहम्मदी दरवाजा'' या नावाने सुद्धा ओळखला जातो. ह्या दरवाज्याची आणि त्याच्या सभोतालच्या भागाची स्थापत्य रचना लक्षात घेता आणि शिलालेखातील उल्लेखाचा विचार करता याचा हिंदू स्थापत्य आहे असे रचनेतील बांधकामाशी मेळ बसत नाही. किंवा हे हिंदूचे स्थापत्य आहे असे म्हणण्यासारखे पुरावे नाहीत. एका स्थानिक लोक कथेवरून ह्या किल्याचा संबंध ईल राज्याशी जोडल्या जातो. लोककथेत 'राजा ईलाल' या नावाचा उल्लेख येतो. ह्यावरून ईलीचपुरचा राजा ईलच्या संबंधात हा उल्लेख आला असावा. स्थापत्यरचनेचा पुरावा लक्षात घेता हे प्रवेशद्वाराचे पूर्णतः मुसलमानी स्थापत्य रचनेतील आहे. ह्या प्रवेशद्वारावरील शिलालेखानुसार ह्या प्रवेशद्वाराचे सुशोभीकरण इ.स. १४८७ च्या दरम्यान फत्तेउल्ला इमाद उल मुल्क याने केला असा उल्लेख मिळतो. प्रवेशद्वाराचे कमानीची बांधणी भव्य आकारात आहे. त्यांची जमीनीपासून ते वक्रशीर्ष कमानी पर्यंतची उंची १५ फुट उंच असून रूंदी साडेदहा फुट आहे. संपूर्ण प्रवेशद्वाराची उंची ३७ फुट ३ इंच आहे. वरील कमानीच्या खालून दुसऱ्या कमानीच्या पटावरील वर्तुळात अरबी लिपीत लेख कोरला आहे. त्याच्यावर उभ्या आकारात अनेक कंगण्या कोरल्या आहेत, त्यापैकी एका पटावर अश्वमुखी कलाकृतीचा स्तर कोरला आहे, उभ्या द्वारपार्श्वावर आणि कमानीच्या सभोताल खोबणीचे चौकट (फ्रेमवर्क) कोरले आहे, अधीष्टानावर पिंपळपानाच्या नक्षी कोरल्या आहेत हे द्वार दक्षिणामुखी असून प्रवेशद्वारास चावडी आहेत आणि म्हणूनच वऱ्हाड प्रांतातील एक उत्कृष्ट आणि सुंदर स्थापत्य कलाकृती म्हणून या महाकाली दरवाज्याचा उल्लेख करावा लागतो. दरवाजा वालुका पाषाणात असून त्यावर अत्यंत सुबक नक्षी आणि कमळपुष्प युक्त कंगोरे आदींचे अलंकरण आहे. दरवाजाच्या बाजूस असलेल्या खिडक्या, त्याची झापे ही जाळीदार तावदानींनी आणि अनेक नक्षींनी अलंकृत केलेली आहेत जणू काही, लाकडी खिडक्या प्रमाणेच ह्या खिडक्या अत्यंत सुबकपणे कोरल्या आहेत. पाषाणातच (लाकडी कामाप्रमाणे) ब्रॅकेट बसविले असून त्यातील गॅलऱ्या (कंगनी) बरेच खोल अश्या

आहेत. जणू काही त्या खिडक्या भार वाहनासाठीच उभारल्या आहेत असे वाटते; त्याचप्रमाणे तेथील लहान स्तंभ, भिंतीस्तंभाचे अंकन, विलोभनीय असेच आहे. येथील बांधकामाची विशेषत: अशी की, येथील सर्वसाधारण नक्षीतसुद्धा अनावश्यकता वाटत नाही आणि म्हणूनच येथील कलाकार हा नक्षी अलंकरणाच्या विपूलतेत समन्वय साधण्यांत आश्चर्यकारकरित्या सफल झाला आहे, असे म्हणावे लागते म्हणूनच हे प्रवेशद्वार अन्य प्रवेशद्वारपेक्षा फारच भिन्न स्वरूपाचे व एक वेगळे स्थान राखून आहे. दरवाजाच्या पार्श्वभागात दोन बाजूस गॅलरी व खोल्या आहेत या खोल्या रक्षकांकरिता बनविल्या असाव्यात.

## शिलालेख-

१) दरवाज्यावर दोन भागात फारसीतील लेख कोरले आहे. येथील वरच्या भागात कोरलेल्या लेखाचा संपूर्ण अर्थ लावता येत नसला तरी लेखात इस्लाम धर्माच्या संबंधित कुराणातील 'आशीर्वादात्मक वचनाचा' त्यांत समावेश आहे हे स्पष्ट होते, तसेच त्यांत कालगनेचाही उल्लेख आहे, त्यांत नमूद केलेली तिथी हिजरी सन ८९२ (इ.स. १४८७) अशी आहे, सदर लेख विजयाच्या स्मृति करिता कोरला असावा असा विद्वानांचा समज आहे. परंतु फत्तेउल्लाने इ.स. १४८७ मध्ये शत्रुवर विजय मिळविल्याचा उल्लेख नाही, प्रामुख्याने हा उल्लेख फत्तेउल्लाच्या राज्य भरभराटीच्या कारर्कीदीविषयी अंलकारिकपणे केला असावा. कारण हे सत्य आहे की, तो एक कर्तबगार स्वतंत्र शासक होता आणि त्यानेच ह्या प्रवेशद्वाराचे सुशोभीकरण केले असावे. बाकीचा लेख त्याच्या सुन्नी धर्माच्या श्रद्धेविषयी आणि धर्मभोळेपणाविषयी निर्देशक असा आहे.

हा लेख मोहम्मद अब्दुला यांनी लिहला असून त्यात विजयाची तारीख हिजरी सन ८९२ (इ.स. १४८७) असी आहे. या लेखाचा सारांश असा -''ईश्वराच्या अस्तित्वाशिवाय जीवन अपूर्ण आहे. ईश्वर हा एकच आहे आणि तो आहे 'अल्ला' मुहमद हा अल्लाचा दूत (प्रेषीत) आहे, अल्लाचा त्यावर वरदहस्त असून त्यास आशिर्वाद प्राप्त झाले आहे, आणि अश्या सर्वच प्रेषिताचे अल्ला कल्याण करतो, तो ब्रह्मांडाचा

शासनकर्ता असून पालनकर्ता आहे. जो कुराणावर विश्वास ठेवतो, त्यातील तत्वांचे पालन करतो अश्या सर्व अनुयायावर आणि मुसलमानावर अल्लाची नेहमीच मेहरनजर असते, तसेच धर्मासाठी मरणारे, करबागा, हमजाह आणि अब्बास आणि मदीनासाठी जो सहकार्य करतो अश्या सर्वांचाच अल्ला स्वीकार करतो.''

२) दुसरा लेख हा वरील लेखाच्या खाली प्रवेशद्वाराच्या कमानीयुक्त पटात व ोरला आहे; ह्या लेखावरून बहामणी राजवंशावळीची माहिती मिळते. हा लेख कमल जंग यांनी लिहला आहे. शिलालेखाचा सारांश असा-

''थोर आणि उदात्त सुलतान गाजी शाहबुद्दीनीया (इ.स. १४२२ ते १४३६) कार्यकाळापासून मोहम्मद शाहुवली अल-बहमणीचा मुलगा अमहमदशहा (इ.स. १४३६ ते १४५८), हुमायुनशहा (इ.स. १४५८ ते १४६१), अहमदशहा चा मुलगा अहमदशहा,मोहम्मदशहा आणि मुहम्मदशहा (इ.स.१४८२ ते १५१८) मोहम्मदशहाचा मुलगा यांनी अल्लाच्या हुकुमावरून न्यायाने राज्य करून नांव अजरामर केले.''

फेरीस्ता यांच्या मतानुसार मोहम्मद हा बहमणी राजवटीतील पाचवा सुलतान होय. फेरीस्ता याचे मत ग्राह्य धरल्या बहमणी राजवटील पाचवा सुलतान मोहम्मद (दुसरा) हा ठरतो. याचा कार्यकाळ इ.स. १३७८ ते १३९७ असा आहे. म्हणूनच इ.स.१४२५ मधे आधीच असलेल्या किल्याची अहमदशहावली (इ.स. १४२२ ते १४३६ ) याने या किल्ल्याची दुरूस्ती केली होती.

परंतु लेखातील बहमणी बादशहांची वंशावळ लक्षात घेता मोहम्मद हा बहमणी राजवटीतील पाचवा मोहम्मद दुसरा नसून गाजी शहाबुद्दीनीया याच्या करिताच या लेखात मोहम्मद शादुलवली अल-बहमणी असा उल्लेख आला आहे. आणि तोच या राजवटीतील नववा बादशहा शहाबुद्दीन अहमदशहा (पहिला) हा होय.

**थडगे-**

महाकाली दरवाज्यातून मार्गक्रमण केल्यानंतर, सावरवली बागची आणि गज बादशहा वली यांचे घुमटाकृती थडग्याचे दर्शन होते. सदर थडग्याचे बांधकाम अगदी साध्या पद्धतीने केले आहे. याचे वंशज हे वाघाच्या गाडीतून सवारी करीत असत असा

उल्लेख जुन्या दर्शनिकेत मिळतो आणि म्हणूनच ह्या थडग्यांच्या आजुबाजूस रात्री वाघ येत असतात असे सांगितले जाते. परंतु सावरवली बागचे आणि गज बहादूर वली हे कोण होते ह्याविषयी उल्लेख मिळत नाही.

## दिल्ली दरवाजा-

किल्यातील दुसऱ्या तटाचा मुख्य दरवाजा म्हणजे दिल्ली दरवाजा होय. नरनाळा किल्ल्यात सर्वांत उंच जागेवर असलेला हा दरवाजा आहे व त्याच्या अवती-भोवती किर्र झाडी आहे, या दरवाज्यावर एक महत्वाचे ठिकाण आहे की, त्या स्थळावरून रात्रीच्या वेळी सभोवताल नजर फिरविली असता १००-१२५ कि.मी. अंतरावरील अमरावती-अकोला शहराचे प्रकाश दिवे नजरेस पडतात,

दिल्ली दरवाजा हा उत्तराभिमुख बांधणीचा असून बांधणी साध्या पद्धतीची आहे. ह्या दरवाज्यास एकच कमानपट्टी असून दरवाज्याच्या दोन्ही बाजूस चौक्या आहेत. पश्चिमेकडे एक रक्षक चौकी तर पूर्वेकडील भागात दोन चौक्या आहेत.

दिल्ली दरवाज्याच्या तटा-तटाने पुढे काही अंतरावर गेल्यावर शहापूर दरवाज्याचे दर्शन होते. हा दुय्यम प्रकारचा दरवाजा असून ह्यास चोर दरवाजाही म्हणता येईल. ह्या दरवाज्याचा उपयोग संकटसमयी बाहेर पळण्याकरिता होत असावा. शहापूर दरवाज्यानंतर आकोट दरवाज्याचे दर्शन होते. ह्या दरवाजाची स्थापत्यरचना सुद्धा शहापूर दरवाजाप्रमाणेच आहे.

दिल्ली व शहापूर दरवाजे आज बऱ्या अवस्थेत असले तरी ते नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत. किल्याच्या तटबंदीस ६७ बुरूज असून खुनी बुरूज आणि तेलीया बुरूज नामांकित आहेत.

## खुनी बुरूज-

ह्या किल्यातील एक अन्य महत्वाची आणि नाविन्यपूर्ण वास्तू म्हणजे 'खुनी बुरूज' त्याच्या बाजुलाच एक कडेलोट चौधरा बांधला आहे. ह्या स्थानाचा उपयोग गुन्हेगारास दिलेली शिक्षा अंमलात आणण्यासाठी केला जात असे. शिक्षेपूर्वी गुन्हेगाराचे

हात, पाय बांधून त्यास बुरूजाच्या कड्यावरून लोटल्या जात असे. (कडेलोट) त्यानंतर कड्यावरून मोठमोठे दगड गडगडत सोडले जाई. त्यानुसार गुन्हेगार मरेपर्यंत ही क्रिया केली जाई. गुन्हेगारास मरणापूर्वी वेदना होवून तडफडून त्याचा मृत्यू व्हावा अशीच सदर शिक्षची कल्पना असावी, जेणेकरून इतर गुन्हेगारांवर सुद्धा वचक बसावा.

### कैदखाना–

ही इमारत किल्ल्याच्या पूर्वेस असून त्याचा उपयोग कैदखाना म्हणून केला जात असे, कैदींना येथील खिंडशीत उभे केले जात असे आणि त्यानंतर त्यांच्या डोक्यावर मोठ-मोठे दगड ठवले जात, हे दगड शिरच्छेद करण्याच्या हुकमापर्यंत तसेच ठेवले जात आणि हुकूम प्राप्त होताच त्यानंतर कैद्यांचा शिरच्छेद केला जाई, असे फेरिस्ता उल्लेख करतो. तर काहीना शिक्षेच्या स्वरूपाप्रमाणे कैदेतच पुर्णवेळ ठेवले जात असे.

### जामा मशीद–

जामा मशीद ही नरनाळ्या किल्यातील एक मोडकळीस आलेली वास्तू आहे; ती किल्यातील मध्यभागात एका मोक्याचे जागेत बांधली असून बऱ्याच अंतरावरून तिचे दर्शन होते. तिचे स्थापत्य डौलदार आणि भव्य स्वरूपाचे आहे, परंतु आज जे काही अवशेष शिल्लक आहेत ते दर्शनीय आहेत असे म्हणता येणार नाही. असे म्हटले जाते की, ह्या मशिदीच्या दर्शनिय भागात एक लेख कोरला होता. त्यावरून ही मशीद महाबदखान यांनी हिजरी सवंत ९१५ मधे म्हणजेच इ.स. १५०९ मध्ये बांधली असा उल्लेख येतो, परंतु आज ज्याप्रमाणे मशीद पडक्या अवस्थेत आहे त्याचप्रमाणे हा लेख सुद्धा कालौघात नष्ट झाला असावा.

### लहान मशीद–

जामा मशिदीच्या समोर एक अन्य आकाराची लहान पण उत्तम स्थितीत असलेली मशीद आहे. मशीद पूर्वाभिमुख असून दर्शनी भागात महाकाली

दरवाज्याप्रमाणे कमळनक्षीनी अलंकृत केलेला आहे. दर्शनी भागात अष्टकोनी चार स्तंभ आहेत आणि त्यावर तीन कमानी आहेत. घुमट गोलाकार असून उंच आहे, मशिदीचा मूळ पाया मजबूत अश्या काळया बेसाल्ट पाषाणात उभारला आहे. येथील स्थापत्य रचनेवरून हया मस्जिदीचे छत वास्तूच्या भिंती बांधल्या नंतरच्या काळात उभारले आहे असे दिसते. येथे एक शिलालेख कोरला आहे त्या लेखात ह्या मशिदीच्या संदर्भात असा उल्लेख येतो की, दक्षिणेचा बादशहा अफजलुदौलाहाचा जावई नबाब खुर्शीदशाह याने १४ सफर हिजरी सन १२९१ मधे म्हणजेच इ.स. १८८५ मध्ये नरनाळयास भेट दिली होती त्यावेळी त्यानेच ह्या मशिदीचे जुने छत काढून नवीन छताचे बांधकाम केले. ह्या मशिदीत सभोताल एकूण १४ लहान कोनाडे आहेत. हया कोनाडयांचा उपयोग रात्री दिवे ठेवण्याकरिता केल्या जात असे, मागील भिंतीच्या मध्यभागात अत्यंत उच्च कोटीचे कलात्मक बांधकाम केले आहे. सदर बांधकाम हे पाषाणातील असले तरी प्रथम दर्शनी बघणाऱ्यास जणू काही हा दरवाजाच असून तो अगदी लाकडात बनविला आहे असे वाटते. त्याचा इंच नि इंच भाग नक्षीकृत असून कमानी ही अंलकृत आहेत. दरवाजा जणू काही बंद केला आहे की काय असाच दिसतो. एकंदरीत येथील कलाकार हा उच्च कोटीतील जाणकार आणि कसबी होता असेच म्हणावे लागेल.

ह्या मशिदीच्या जवळच उत्तरेस अत्यंत सुरेख आणि कलात्मक अशी घोडपागेची वास्तू आहे.

## अंबर महाल / अंबा महाल –

महाकाली दरवाजानंतर त्याच रस्त्यावरचा छोटासा दरवाजा ओलांडून गेल्यानंतर भव्य इमारत दृष्टीस पडते. हया वास्तूस अंबा महाल, अंबर महाल, राणी महाल आणि बारादरी अश्या विविध नावानी ओळखले जाते. हे महाल उत्तराभिमुख असून त्यास भव्य खुला फरसबंदी मंडप आहे, (पटांगण) त्याच्या समोर मध्यभागात कारंजे आहे. खुल्या मंडपात स्तंभ उभारण्याकरिता केलेली छिद्रे आजही बघावयास मिळते. तसेच महालाच्या आजूबाजुस सात-आठ फुट लांबीचे पाषाणस्तंभ पडलेले आहेत. महालात

सतत खेळती हवा रहावी म्हणून आठ झरोके आहेत. तसेच रात्री दिवे ठेवण्याकरिता मागील भिंतीत एकूण २३ दिपकोनाडे आहेत. हया इमारतीचे बांधकाम पूर्व-पश्चिम १९ मिटर लांब आणि उत्तर -दक्षिण ६ मिटर रुंद असे आहे, त्यास तीनकमानी आहेत, तसेच बाहेर जाण्यासाठी पायऱ्या आहेत. या इमारतीच्या गच्चीवरुन दूरदूरची खेडी पत्त्याच्या बंगल्यासारखी दिसतात, २५ मैलावर असलेल्या पूर्णा नदीचे पावसाळयातील पुराचे पाणी मोठे मनमोहक वाटते. सातपुडयाच्या उंच उंच शिखराचे भव्य दर्शन घडते, ह्याच इमारतीच्या समोर बारमाही पाणी असलेला मोठा तलाव आहे त्यांस शक्कर तलाव म्हणतात. येथून किल्याच्या दुसऱ्या परकोटाकडे जाण्याचा मार्ग आहे.

हया वास्तुचा काही इतिहासकार बारादरी म्हणून उल्लेख करतात आणि त्याचा उपयोग डागबंगला म्हणून केला जाई असा उल्लेख मिळतो. अलीकडे हया वास्तूच्या स्थापत्यात आणि कलाकौशल्यादी कामात विध्वंसकपणे बदल केला आहे. घुमटाच्या आतील अत्यंत बांधकामात सुबक कलाकुसरता असून जिला एके काळी गर्द निळया रंगाचा लेप होता असे सांगितले जाते चुना लावल्यामुळे तो आता दिसेनासा झाला आहे.

ह्या महालाच्या बाजुलाच बुऱ्हाणउद्दीन यांचे पडक्या अवस्थेत असलेले थडगे आहे. हयास स्थानिक लोक 'कुत्र्याचे मंदिर' म्हणून ओळखतात. त्याच्या बाजुलाच शक्कर तलाव आहे.

अंबर महालाच्या पश्चिमेस काही अंतरावर तळघर आणि भुयारे आहेत. ही तळघरे लहान-लहान खोल्यांची असून ती कमानीयुक्त बांधणीची आहेत. काही इतिहासकार त्यांना 'जनानखान' म्हणून संबोधितात.

## बुऱ्हाणउद्दीन यांचे थडगे –

बुऱ्हाणउद्दीन हा प्रसिद्ध साधू होता त्यास 'बुऱ्हाणउद्दीन अवलिया' या नावाने ओळखले जाई. त्याचे थडगे पाषाणी चौथऱ्याचा उपयोग करून उभारले आहे, या स्थानास 'चावणाऱ्या कुत्र्याचे' 'कुत्तरदेवाचे' ठिकाण म्हणून आजही ओळखले जाते. कुत्रा चावल्यानंतर त्याच्या उपचारार्थ येथे लांबलाबूंन लोक येतात. त्यामुळे हया

थडग्यास गावकऱ्यांच्या दृष्टीने विशेष असे महत्व प्राप्त झाले आहे. पिसाळलेला कुत्रा चावल्यानंतर रोग बरा होण्याकरिता उपचाराचा एक विधी म्हणून हया थडग्यावर गुळ,चुना,उद आणि फुल अर्पण करतात. त्यानंतर थडग्याच्या सभोताल पांच वेळा फेऱ्या मारल्यानंतर थडग्याच्या मध्यभागात पांच प्रकारचे धान्य जसे, हरभरे,ज्वारी, तांदूळ, गहू, तुर वगैरे अर्पण करतात. त्यानंतर जाते वेळी अर्पण केलेल्या वस्तूंकडे किल्याचा शेवटचा दरवाजा ओलांडेपर्यंत त्याने फिरून बघू नये असा दंडक आहे. अश्या विधिने कुत्रा चावलेला रोगी बरा होतो. अशी आजुबाजूच्या गावकऱ्यांची समजुत आहे. परंतू अश्या ह्या गावकऱ्यांच्या अंधश्रध्देमुळे वर्षाकाठी सदर हेड्रोकोबीयाचे किमान एक-दोन तरी रोगी मृत्यूमुखी पडतात असे जाणकारांचे मत आहे. अश्या प्रकारचे रोगी एकतर येथे येण्यापूर्वीच (योग्य वैद्यकीय उपचार न झाल्यामुळे)मरतो किंवा हया थडग्यास भेट दिल्यानंतर मरतो म्हणून बुवाबाजी किंवा वरील अंधश्रध्देवर विश्वास न ठेवता योग्य ते वैद्यकिय उपचार केलेलेच बरे.

## तेल तुपाचे टाके –

हे टाके (हौद) जमिनीत मोठे खड्डे तयार करून त्यावर पाषाणाचे बांधकाम केले आहे. येथे असे एकूण चार टाके आहेत. ह्या टाक्यावर अत्यंत आकर्षक आणि सुबक नक्षीवृत कमानीचे बांधकाम केले आहे. परंतु आज त्यापैकी बऱ्याच कमानी तुटलेल्या आहेत. ह्या टाक्याविषयी काही लोकांचा असा समज आहे की, ते जैन धर्मीय लोकांचे पाण्याचे हौद असावेत; तर स्थानिक लोक त्यांना 'तेल-तुपाचे टाके' म्हणून ओळखतात. त्यांच्या पुष्टीकरिता असे सांगितले जाते की, सदर टाक्यांत तेल व तुपाचा संग्रह करुन त्याचा उपयोग किल्ल्यातील सैनिकाकरिता केला जात असे.

किल्ल्यातील सदर बांधकामाचा आणि स्थापत्याचा विचार करता वरील दोन्ही मत संयुक्तिक वाटत नाही. कारण ह्या टाक्याचे बांधकाम जमिनीत खड्डे तयार करून त्यावर बांधकाम केले असल्यामुळे त्यांचा उपयोग 'धान्य कोठार' (अंबरखाना) म्हणून केल्या जात असावा.

## सैदुलीबाबाचा दर्गा -

बेरार मधील काही प्रसिद्ध साधु पैकी 'सैदुलीबाबा' हा एक साधू होय. त्यास सैय्यदवली किंवा सैदुलीवली या नावानेही ओळखले जात असे. त्याचा दर्गा किल्याच्या वायव्य भागात टेकडीवजा एक उंच स्थळी बांधलेला आहे.

वरील वास्तुशिवाय किल्ल्यात दारु कोठार,धान्य कोठार , हत्तीशाळा, तलावाचा घाट, स्नानगृहे, विहिरी, पाण्याचे टाके, खापरी नळाची पाणी पुरवठा योजना, सराफखाना, घोडपाग, शस्त्रागार, तोफा घडविण्याचे कारखाने मराठा पूर्वकालीन व मराठाकालीन पडकेवाडे, टाकसाळ, तेलियागड येथील मशीद, म्हातोबा, तळघरे आणि भुयारे , सिलखाना राणीवसा किंवा चिल्लीखाना, नगारखाना, तुळशीवृंदावने अशी काही स्थळे आजही भग्नावस्थेत नजरेस पडतात.

## पाण्याची साधने -

**बावीस तळी** - किल्ल्यांत एकूण २२ तलाव आहेत. त्यापैकी सहा तलावात आजही बारामाही पाणी असते. त्यापैकी बरेच तलाव किल्ल्याच्या मध्यभागात आहेत. येथील पाणी पुरवठयाची व्यवस्था ही जुन्या प्रणालीचा वापर करुन खापरी नळांची प्राचीन पाणीपुरवठा योजना तयार केलेली आहे. ह्या जलप्रणालीच्या भागाचे काही अवशेष आजही बघावयास मिळतात. जलप्रणालीकरिता चिनीमातीच्या खापरांचा आणि अन्य मातीच्या खापरांचा उपयोग करण्यांत आला आहे. तसेच एका तलावातून दुसऱ्या तलावात पाणी सोडण्याकरिता किंवा तलाव भरुन वाहणारे पाणी दुसऱ्या तलावात सोडण्याकरिता काही पाषाण नाल्या तलावातील पाण्याच्या पातळी नुसार वरील बांधण्यात आल्या आहेत.

किल्यातील बावीस तलावापैकी वर्षभर नरनाळयावर येणाऱ्याची तहान भागविणारा शक्कर तलाव हा अंबामहालापासून काही अंतरावर आहे. या तलावाच्या दोन्ही बाजूला काळया दगडांनी बांधकाम केलेले असून सुंदर घाट बांधला आहे. पुढे इमली तलाव आहे. ह्यास चंद्रावती तलाव म्हणूनही ओळखले जाते. इमली तलावापासून काही अंतरावर सुंदर धोबी तलाव(रामतलाव) आहे. तलावाच्या बाजूस

अर्धकमान व बांधकामाच्या भिंती आहेत. याचा उपयोग उन्हाळयांत पन्हाळा म्हणून होत असावा असा कयास आहे. धोबी तलावातूनच भोसले काळातील बगिच्याला पाणी पुरवठा केल्या जात असे. शेजारी दोन पक्की वृंदावने नजरेस पडतात. याच परिसरात पिंपळाच्या झाडाखाली शिवलिंग, नाग, हनुमान इत्यादी शिल्पे आहेत. त्याच्या बाजुलाच पुन्हा एक तलाव आहे. त्यास मोठा तलाव (मोती तलाव) म्हणून ओळखले जाते. दिल्ली दरवाज्याच्यासमोर जोड तलाव आहे. या दोन तलावाच्या मध्यभागी मोठ मोठया दगडांनी बांधकाम करून भिंत उभारली आहे. हे दोन तलाव नलदमयंती तलाव या नावाने ओळखले जातात. येथून जाफराबादकडे जाण्याचा मार्ग आहे. जाफराबादकडे पाताळगंगा ह्या नावाने ओळखले जाणारे लहान तलाव असून पावसाळया व्यतिरिक्त अन्य ऋतूत हे कोरडे पडलेले असतात.

**शक्कर तलाव –**

शक्कर तलावाच्या संदर्भात अनेक आख्यायिका स्थानिक मंडळी कडून ऐकावयास मिळतात. त्यापैकी एक आख्यायिका अशी सांगितली जाते की,भक्ताच्या ईच्छेनुसार पांढरी शुभ्र कपीला गाय 'कामधेनू'आहे ती स्वर्गातून मध्यरात्री पृथ्वीवर अवतरली आणि ती नंतर ह्या तलावाच्या पाण्यातून निघून महादेवाच्या पिंडी पर्यंत गेली आणि त्यावर आपल्या दुधाचा अभिषेक केला. परंतु हल्ली येथे शिवमंदिर असल्याचे निदर्शनास येत नाही. ब्रिटीश कालखंडात ही आख्यायिका अंधश्रध्दाळू व शंकेखोर डेप्युटी कमिश्नरास सांगण्यांत आली. ह्या संदर्भात त्याचे असे मत झाले की, हया तलावाच्या परिसरात जनावराचे कळप राहत असावेत. किंवा ह्या तलावात जिवंत गाय सोडली असावी. म्हणून त्याने ह्याची सत्यता पडताळून बघण्याकरिता भोयाकडून तलावात बुडी मारून कामधेनूचा शोध घेण्याचा प्रयत्न केला तिथे त्यास तळातील चिखलाशिवाय काहीही मिळाले नाही. त्यानंतर ज्या तलाठयांनी ही काल्पनिक कथा सांगितलेली होती त्यास सुद्धा ह्या कपीलेचा शोध घेण्याकरिता तलावात उतरविले होते. परंतू त्यास सुध्दा यश आले नाही.

ह्या तलावाविषयी दुसरी आख्यायिका अशी सांगितली जाते की, ह्या तलावात

परिसाचा तुकडा आहे. ह्या तलावातील ज्या ज्या वस्तुंचा स्पर्श होतो त्याचे रुपांतर सुवर्णात झाले होते. परंतु अखेर ह्या आख्यायिकाच आहेत त्यांत सत्यांश फारच कमी त्याचा मतितार्थ मात्र वेगळा असतो. हया अख्यायिकाद्वारा हया तलावातील पाण्याचे महत्व हे कपीलेच्या दुधासारखे पोषक, निर्मळ आणि सुवर्णासारखे बहुमुल्य आहे असेच सांगावयाचे असते.

इ.स.१८९९ -१९०० मध्ये जेव्हा वऱ्हाडात पाण्याचा भीषण दुष्काळ पडला, त्यावेळी हा तलाव पूर्णपणे सुकला होता. त्यावेळी वरील कहाणीच्या संदर्भात शोध घेण्याचा प्रयत्न झाला होता. परंतु तिथे चिखलाशिवाय काहीच मिळाले नव्हते.

## धोबी तलाव -(राम तलाव)

चित्ताकर्षक तलाव आहे. येथे बाराही महिने पाणी असते. तलावाच्या एका बाजूस अर्धकमान बांधकामाच्या भिंती आहेत. त्याचा उपयोग उन्हाळयात पन्हाळा म्हणून होतो. या भिंतीत दोन छिद्रांचे दगड असून त्यातून येथील बगिच्याला दगडात बनविलेल्या पन्हाळीद्वारे पाणी देण्याची व्यवस्था केली आहे. हा बगीचा हयापूर्वीच वर्णन केल्याप्रमाणे भोसले राजवटीत तयार केला होता. हया शिवाय येथे दोन भव्य तुळशीवृंदावने आहेत. याच तळयाच्या दक्षिण टोकावर 'म्हतोबा' चा ओटा आहे. सर्पदंशावर उपचार म्हणून हया ओटयाची पूजा केली जाते. पूजेने सर्पदंशाचा रोगी बरा होतो अशी परिसरातील लोकांची श्रद्धा आहे. सर्पदंश बरा करणारे दैवत म्हणून म्हतोबांचे ठिकाण आजही प्रसिद्ध आहे. देवाच्या नावाने येथे पशुबली दिला जातो. तसेच हे ठिकाण देवाचे स्थान म्हणून सुद्धा प्रसिद्ध आहे. येथील एक दगड किंवा माती भक्ताच्या डोक्यावर ठेवल्यावर त्यास दैवी शक्ती मिळते. त्यानंतर तिथे तुपाचा दिवा पेटविला जातो. राळ,उद,घुग्गळ किंवा धूप प्रतवार लावले जाते. त्यानंतर देव भगताच्या शरीरात संचार होतो त्यामुळे तो कापरे भरल्यासारखे करतो. त्यास देव अंगात येणे असे म्हणतात. त्यानंतर तो ताबडतोब आज्ञातीत हवाला द्यावयास लागतो. दुःखीतांचे दुःख दूर करतो. रोग्याचे रोग बरे करतो. गुराढोरांना सुद्धा निरोगी करतो अशी म्हतोबाची ख्याती आहे.

जुन्या १९११ च्या गॅजेटीयर मध्ये सुद्धा उल्लेख आला आहे की, वरूड येथील

महार समाजातील व्यक्तीच्या अंगात म्हसोबा देव येत होता. तो दरवर्षी येथील यात्रेस येत असे. तो पूजा नित्यनेमाने मांडीत असे. आज तिथे अगदी ओबडधोबड तांबड्या रंगाचे दगड ओबडधोबड चौथऱ्यावर 'म्हतोबा' म्हणून ठेवले आहेत. आजही हे स्थान सर्पदंशावर उपचार करण्याचे स्थान म्हणून प्रसिद्ध आहे.

हया स्थानाच्या जवळच बजरंगबलीची विरासनात उभी असलेली मूर्ती आहे. बजरंग मूर्तीच्या जवळच जुन्या टाकसाळीचे भग्न अवशेष आणि काही मुसलमानांची थडगी बघावयास मिळतात. हया परिसराच्या संदर्भात असे म्हटले जाते की, भोसले काळात येथे २,००० ते २५०० लोक राहत असत. अधिक लोकसंख्येमुळे येथे निरनिराळ्या आकाराच्या आणि प्रकाराच्या इमारती होत्या आज त्या पडक्या स्थितीत तर काही बऱ्या स्थितीत बघावयास मिळतात.

सुंदर वनश्रीने भरलेला हा परिसर आणि तलाव अत्यंत नयनरम्य असा दिसतो. तलावाकाठी सकाळी आणि सायंकाळी मोर येतात. तसेच दिवसा नाना प्रकारचे पक्षी येथे विहार करतांना दिसतात. लांडगे, पाणकोंबडें, हरीण, ससे, आदी वन्य प्राणी सुद्धा बघावयास मिळतात.

दिवसा तलावावरील पक्षांचा किलबिलाट ऐकतांना सारे काही विसरुन एका वेगळ्या विश्वात असल्याचा आनंद मिळतो. पक्ष्यांची गाणी 'कोकीळा' अधूनमधून आपल्या मधूर कंठाने या परिसरात नवचैतन्य आणीत असते. पक्षांचा अभ्यास करणारे पक्षीतज्ञही येथे येतात. आयुर्वेद शास्त्रातील अनेक महत्त्वपूर्ण औषधी येथे आहेत. काही वैद्य याचा पुरेपूर लाभ घेतांना आढळून येतात; हिरडा,बेहळा,आवळा, चारूळी, सुरनकंद आणि अन्य वनऔषधी येथे मुबलक प्रमाणात आहे.

## मासे पकडण्याची पध्दत–

इमली तलाव, जोडतलाव आणि मोठा तलाव येथून प्रामुख्याने मासे पकडल्या जातात. येथे मासे पकडण्याची अभिनव पद्धत वापरली जाते. मासे पकडण्याचे काम पांच-सहा स्त्री पुरुषांच्या गटाने केले जाते, स्त्री-पुरुष तलावात उतरुन हू-हु करतात त्यास 'हाकारा' असे म्हणतात. तलावातील पाणी आपटत सर्व तलावभर फिरतात

आणि त्या नंतर लुगडे किंवा लांब वस्त्राच्या सहाय्याने मासे पकडले जाते. (लांब वस्त्र पाण्याच्या आंत धरुन)अजूनही येथे जाळयाने मासे पकडले जात नाही असे दिसते.

## नऊगजी तोफ –

अंबा महालाच्या पूर्वेस मोकळया मैदानावर किल्याच्या पश्चिम टेकडीवर एक मोठी दक्षिणाभिमुख तोफ मांडली आहे. ही तोफ औरंगजेबाच्या कारर्कीदीत इ.स. १६७९ मध्ये आणली होती असा उल्लेख मिळतो. त्यावर परशीयन लिपीत लेख कोरला आहे. ही तोफ १८ फूट लांब असून तिचा परीघ ६ फूट आहे. ह्या तोफेतून सोडलेले गोळे ७ मैलापर्यंत शत्रुपक्षावर मारा करण्यास उपयोगी पडत असे. तिला 'नऊगजी तोफ' म्हणून ओळखले जाते. सदर तोफेच्या लांबीवरुन हे नाव पडले असावे. ती अष्टधातूत घडविली आहे. तिचा आकार लाकडी मोळी सारखा असून तिचे टोक दक्षिणेकडे आहे. तोफ वरून सपाट आहे. तिच्यावर कोरलेल्या परशीयन लेखाचा मजकूर पुढीलप्रमाणे आहे.

''तो (ईश्वर) सर्वसाक्षी अंतिम शाश्वत, असा हा एकच आहे. बादशहा औरंगजेब आलमगीर याची ही तोफ नऊ गज लांब आहे. ती दक्षिणेकडील राजाच्या काळातच त्याच्या आदेशानुसार बनवीली आणि आता ह्या तोफेस अतूल बेगने जमादी उल अव्वल महिन्यात (पहिल्या) १०९०-९१ हिजरी मधे इ.स. १६८४-८५ मधे नरनाळा किल्ल्यावर आणली. पृथ्वीचा, जगावर स्वामी शासन करणारा, प्रतिपालन करणारा, त्याच्या हुकमाने मार्गदर्शनाखाली ही तोफ येथे मजबूत करण्यात आली.''

(हा लेख प्रल्हाददास काईल्ह यांने लिहला.)

ह्याच तोफेवर पुढे असाही मजकुर लिहला आहे की-

''ही तोफ दिडसे वर्षापासून ईथेच परिसरात पडलेली होती. ह्या तोफेस आतापर्यंत (अतुल बेगच्या पूर्वी) कुणीही त्या जागेवरून हटवीले नव्हते.''

लेखातील पुराव्यावरून अतूल बेग यास याच्या कार्याबद्दल अभिमान वाटतो. तसेच ह्या लेखावरून ही तोफ हिजरी सन ९४१ (इ.स. १५३४-३५ मध्ये येथे होती हे

स्पष्ट होते. म्हणजेच इमादशाहीत दक्षिणेकडील बादशहाने ही तोफ घडवीली असावी.

## कडक बिजली तोफ –

भयंकर आग ओकणारी ही तोफ म्हणून तिला 'कडक बिजली'या नावाने ओळखले जाई. परंतु आता ही तोफ डोंगराच्या कड्यावरुन 'चंदन खोऱ्यात' पडली असे सांगीतले जाते, परंतु आजतागायत तिचा शोध लागलेला नाही. चंदनाच्या वृक्षाची दरी आणि ही तोफ दृष्टीआड होणे हे एक विलक्षण गूढ आहे.

वरील तोफाशिवाय अन्य दोन तोफा महाकालीद्वारा नंतरच्या एका प्रवेशद्वाराच्या दक्षिणेस आणि अकोला दरवाजाच्या जवळ ठेवल्या आहेत.

१८५७ च्या बंडाचे वेळी तात्या टोपे आणि मुगुटराव हे जळगावांस आले होते तेव्हा नरनाळयातील काही तोफा, दारुगोळा आकोटास आणला होता. हयावेळी हा किल्ला निजामांच्या ताब्यात होता. असे म्हटले जाते की, येथील तोफा हजार बाराशे लोकांच्या मदतीने किल्यावरून खाली उतरवून बैलांच्या मदतीने आकोटास आणल्या . सोबतच काही स्फोटक पदार्थही आणले होते. आजही किल्यात दारुगोळयांची पडक्या अवस्थेत असलेली इमारत आपणास बघावयास मिळते.

## नरनाळा पर्यटन केंद्र–

नरनाळा किल्यांचा योग्य प्रकारे विकास केल्यास, चिखलदरा, गाविलगड,सेमाडोह, कोलखास व नरनाळा अशी एक उत्कृष्ट साखळी पर्यटकांसाठी निर्माण होऊ शकते. येथील नैसर्गिक सौंदर्य अप्रतिम आहे. पर्यटकांसाठी विश्रामगृह बांधणे, विद्युत पुरवठयाची सोय करणे इ. कामे करावी लागतील किल्ल्यात बारमाही पाणी असलेले तलाव आहेतच, पर्यटकांसाठी त्यातील पाण्याचे योग्य नियोजन करणे आवश्यक आहे.

किल्ल्यात अनेक प्रकारच्या पक्षांचे वास्तव्य असते. त्याचे योग्य नियोजन करून एक प्रशस्त 'पक्षी अभयारण्य' होऊ शकते. या परिसरात अत्यंत उपयुक्त वनस्पती

आहेत, येथे आयुर्वेद संचालनालयाकडून वनौषधी उद्यान केल्यास वैद्यकीयशास्त्रास अनमोल मदत मिळू शकते. किल्यावरील हवामान आरोग्यदायी असल्याने येथे क्षय रुग्णासाठी क्षयधामही निर्माण केल्या जाऊ शकते.

अश्याप्रकारे पूर्वीच्या काळी आपल्या अभेद्य तटबंदीने शत्रुपासुन संरक्षण करणारा 'नरनाळा' आजच्या युगातील अनेक समस्यांवर उपयोगी पडण्याची क्षमता राखून आहे. परंतु सातपुडयाच्या कुशीत असलेला हा किल्ला पर्यटकांच्या दृष्टीने आणि शासनदरबारीही उपेक्षित असाच आहे. सदर स्थळ उत्कृष्ट पर्यटन स्थळ म्हणून आजही नावारुपास येवू शकतो. परंतु गरज आहे दृष्टीची, योग्य नियोजनाची, त्वरित निर्णयाची व कडक अंमलबजावणीची परंतु कोण जाणे याची पेक्षा करीत व वाट पाहातच हा 'नरनाळा' भंगणार, खंगणार तर नाही?



# १२. शिलालेख

१) महाकाली (मुहम्मदी) दरवाज्यावरील लेख

भाषा-अरेबीक

लिपी-परशीयन

(a) Upper inscription.

في تاريخ الفتح قال الله تبارک و تعالی مَنْ دَخَلَهُ كَانَ آمِنًا سنه اثنی و تسعین و ثمانمائة
سبحان الله لا اله الا الله و محمد رسول الله صلی الله علیه و سلم و صلی علی جمیع الانبیاء
والمرسلین و الملائکة المقربین الحمد لله رب العالمین اللهم ارحم علی الخلفاء الراشدین المهتدین
اولوالفضل من امیرالمؤمنین و من المسلمین ابا بکر[1] الصدیق و عمر الفاروق و عثمان و علي المرتضی
و الحسن الرضا و الحسین والشهداء[2] الکربلا و الحمزة و عباس و المهاجرین و الانصار رضوان الله
علیهم اجمعین

حرره محمد عبد الله

(b) Lower inscription.

في الزمان[3] السلطان الاعظم المعالي الغازي شهاب الدنیا و الدین محمود شاه بن
محمد شاه بن همایون شاه بن احمد شاه بن محمد شاه الوالي البهمني . خلد الله ملکه و سلطنته
و خلافته

کتبه کمال جنگ

**भाषांतर**          **अ) वरील लेख**

फी तारीखु-ल-फतह काललाह तबारक-व ताला मन दखलहू काना आमना सन अत्नीन तस अीन व समानमा नंहू सुबहानल्लाह ला ए लाहा इल्ललाहो मोहम्मदुर्रसूलुल्लाह सलल्लाहो अलैह व सल्लाम सलल्लाहो जमी-उल-अम्बीया वल मुर सलीन वल मलाअेकतल मुकर्रबीन। अल हमदो लिल्ला हे रब्बील आलमीन अल्लाहुम्मा अरहमा अलल खुलफाईर राशेदीन-ल मोहतदीन अूलूल फजला मन

मोमेनीना व मनल मुसलेमीना अबाबकर (।) अससिद्दीक व अमरूल फारूक व उसमान व अलीदूल मुरजा वल हस्नल रजीवल हुसैना वश शोहदा आ (२) अल करबला वला हमरता व अब्बासा वल महाजरीना वल अन्सारा रिजवानललाह अलैहिम अजमअीन

**हररा मोहम्मद अब्दुल्लाह**

### ब) खालील लेख

फिज जमा (३) अससुलतानाल आजमल मआली अल गांजी शाहाबद दुनिया वद दीना/महमूदशहा बीन मोहम्मद शाह बिन हुमायुशाह बिन अहमदशाह बिन मोहम्मद शाहल वाली अल-बहमनी खुलदुल्लाह मलका व सलतनता व खिलाफता

**कतबा कमाल जंग**

## २) नवगज तोफेवरील लेख

भाषा- परशीयन

लिपी- परशीयन

هوالباقي

شاه اورنگ‌زیب عالم گیر

این توپ نه گزي است که در عمل دکهنیان ساخته اند در این زما

ندا درگاه اتلو بیگ بر قلعهٔ نرناله رسیده در ماه

جمادي الاول سنهٔ یکهزار و نود و یک هجري مقدس

باقبال حضرت خدیو زمین و زمان خداوند جهان و جهانیان

پیر و مرشد حقیقي توپ مرقوم را بر زین استوار نمود

راقمهٔ پهلاد داس کایتهه

و یکصد و پنجاه سال است که این توپ بتسخیر درآمد

تا بهذه الایام هیچکس بالاي زین نکرده بود

**भाषांतर**

होवल बाकी
शाह औरंगज़ेब आलमगीर
ओं तोप नोहगजी अस्त के दर अमले दखनियाँ
साख्ता अन्द। दरिन विला बन्दा दरगाहे
अल्लू बेग बर किल-ए-नरनाला रसीदा दर माहे
जमा-दी-उल-अव्वल सन-ए-यक हजार नवद
व यक हिजरी मुकद्दस बा इकबाले हजरत
खरदीव जमीनो जमान खुदा वन्दें जहाँ व जहाँनियाँ
पीरो-मुरशदे हकीकी तोप ए-मरकू मराकूमरा बर
जी-न-दूस्तवार नमूद

राकम-ए पहलाद दास काईल्ह !

व यक सद व पन्जाह साल असा के अी
तोप तसरवीर दर आमद ता ब हाजा अल-
अय्याम हेचकस बाला-ए-जीन न करदा बूद।

**३) लहान मसजिद मधील लेख-**

भाषा- परशीयन
लिपी- परशीयन

نواب خورشید جاه
نواب افضل الدوله بهادر
دکن ۱۴ ماه صفر سنه ۱۲۳۱ هجری
آمده بودند

भाषातंर -

नवाब खुर्शीद जाह
दामादे अफजलुददौलह बादशाहे
दक्कन चौदाह माह सकर सन एक हजार
दो सौ इक्यान्वे हिजरी आमदा बुदन्द !



# संदर्भ ग्रंथ सुची


| | | |
|---|---|---|
| १) | अमरावती जिल्हा दर्शनिका | १९६८ |
| २) | अकोला जिल्हा दर्शनिका | १९७७ |
| ३) | सेंट्रल प्रोव्हिन्सेस जिल्हा गॅजेटियर अमरावती जिल्हा. | १९११ |
| ४) | वऱ्हाडचा इतिहास | १९२४ या.मा.काळे |
| ५) | नागपूरकर भोसल्यांचा इतिहास | १९७९ या.मा.काळे |
| ६) | नागपूरकर भोसलेकालीन पत्रव्यवहार | १९७९ सं.सदेशाई, कुलकर्णी व काळे |
| ७) | महाराष्ट्राचे जिल्हे - अमरावती | प्रसिद्धी विभाग महाराष्ट्र शासन मुंबई-१९९६ |
| ८) | महाराष्ट्राचे जिल्हे - अकोला | |
| ९) | चिखलदरा दिग्दर्शन एवम गाविलगड किल्ला | स्व.सुर्यभानसिंह ठाकूर |
| १०) | मध्यप्रदेश के पुरातत्व की रुपरेखा | १९५४ डॉ. मो.ग.दीक्षित. |
| ११) | किल्ले -मराठी रियासत भाग १-२ | १९४२ रियासतकार - गो.स.सरदेशाई |
| १२) | भारत के दुर्ग | १९९३ दिनानाथ दुबे |
| १३) | Inscription M.C.P. and Berar | Hiralal |
| १४) | Epigraphia Indo-Muaslimica | 1907 Dr.E.Desison, Ross |
| १५) | Historical Land Marks of the Deccan. | 1907 Major T.W.Haig |
| १६) | History of the Maratha | Grand Duffs |



**नाव -** श्री.रा.रा. बोरकर

**जन्म -** ६/९/१९५१
वाढोणा, ता. नागभीड,
जि. चंद्रपूर.

**शिक्षण -** एम.ए.
(प्रा. भा.इ.स.व. पुरातत्व),
नागपूर विद्यापीठ, नागपूर

**पदविका -**
संग्रहालयशास्त्र,
भोपाळ विद्यापीठ.

### प्रकाशित ग्रंथ

१. रत्नागिरी जिल्ह्यातील किल्ले
२. महाकाली चंद्रपूरची
३. रामटेक
४. कोहळी समाज आणि त्याचा इतिहास स
५. सुमारे ६० पुरातत्वीय शोधनिबंध आणि अन्य लेख

### आगामी प्रकाशने

१. पूर्व विदर्भातील किल्ले
२. वाकाटककालीन मूर्तीकला

